रमाकांत : त्यात कसले आश्चर्य आहे! शहाणे लोकही लुच्चे नसतात की काय? अहो ह्या गोऱ्या मूर्ख मिशनरींची काय कथा? तो ॲरिस्टॉटलसारखा तत्त्वज्ञांचा मुकुटमणिदेखील एकदा असेच भकून चुकला की ग्रीस देश हा देवाने जगावर स्वामित्व गाजविण्यासाठी उत्पन्न केला असला पाहिजे! कारण जगाचें राज्य त्याच्या मध्यभागी राहूनच चांगले चालविता येणार; आणि ग्रीस हाच जगाच्या मध्यभागावर - आशिया, युरोप नि आफ्रिकेच्या संगमस्थानी निर्मिलेला आहे. अर्थात तोच जगद्राज्याचा ईश्वरनिर्मित केंद्र असला पाहिजे! ॲरिस्टॉटलला माहीत असलेल्या जगावर त्या काळी ग्रीसचें प्रभुत्व होते म्हणून त्याला हा सिद्धान्त सुचला. पुढे तोच ग्रीस रोमचें पादपीठ झाले नि आज आहे कीं नाही ते जगाच्या आलेख्यात (नकाशात) सूक्ष्मदर्शक यंत्रांतूनच पाहिल्यास दिसते. गेल्या शतकातीलच गंमत पाहा. युरोप - म्हणजेच पाश्चिमात्य राष्ट्रें हीं प्रभुत्व गाजविण्यास निसर्गत:च सक्षम आणि पौर्वात्य दास होण्यास, हा सिद्धान्त बोकाळला होता. तोंच जपानने रशियाचें कंबरडें मोडले! तेव्हा जपान अपवाद ठरून इंग्लंड आणि जपान ही दोन्हीही प्रबल राष्ट्रें या गोलार्धाच्या उत्तरीय शीतकक्षेत असल्यामुळे आणखी काही शहाण्यांनी नवा सिद्धान्त काढला की उत्तरीय शीतकक्षेतील देश हेच दाक्षिणात्य कक्षेतील देशांचे नैसर्गिक विजेते असणार! पण रोम दाक्षिणात्य कक्षेतच मोडणारें असताही ह्या उत्तरीय शीतप्रधान ब्रिटनभूमीला त्याने शतकोशतके आपली दासीं करून ठेवलेली होती! ब्रिटनहून काळसर असणाऱ्या रोमच्या साम्राज्यात ब्रिटनच्या गोऱ्यापान रंगाचे अस्तित्व जर कशात उपयोगी पडले असेल तर ब्रिटनच्या गोऱ्यापान कन्यकांचा रोमन सैनिकांसाठी आणि सरदारांसाठी आवडत्या दासी म्हणून पुरवठा करण्याच्या कार्यीच काय ते होय. आपल्या लाटबाजींचे आणि अहंकाराचें समर्थन निसर्गाच्या आणि देवाच्या नावाने करण्याची खोड मनुष्यमात्रास लागलेली आहे. ठगांच्या अत्याचारांचीही एक देवता होती आणि सैतानही सोयिस्कर वाटलें तर आपल्या समर्थनार्थ बायबलचा आधार घेत असतो.

घनश्याम : पण मग काळा रंग हे एक नैसर्गिक व्यंग आहे हे मघा तुम्हीच कसे म्हणालात?

रमाकांत : आमच्यात ते एक व्यंग आहे असे म्हटले म्हणजे त्या गोऱ्यांत काहीच व्यंग नसून आमच्याहून सर्वातोपरी ते श्रेष्ठ आहेत आणि जगाच्या अंतापर्यंत श्रेष्ठच राहणार आहेत असे ठरते की काय? देहाच्या रंगाचा संबंध मुख्यत: व्यक्तीशी. राष्ट्रीय शक्तीशी, क्षमतेशी किंवा कर्तबगारीशी गोरेपणाचा वा काळेपणाचा लवलेश संबंध नाही. आज आमचें श्यामलवर्णीय हिंदी राष्ट्र जर गौरवर्णीय युरोपियनांपेक्षा राष्ट्रशक्तीत कनिष्ठ ठरत असेल, अवनत असेल तर तो परिणाम आमच्या सामाजिक, राजकीय आणि धार्मिक दुर्गूण नि दुधखुळेपणाचा आहे. आमच्या श्यामलवर्णाचा किंवा त्यांच्या गौरवर्णाचा नव्हे! ते दुर्गुण नि दुधखुळेपणा नव्हता तेव्हा आम्ही राष्ट्र ह्या दृष्टीने श्यामल असूनही जगास भारी झालेलो होतो - ते दुर्गुण सुटताच पुन्हाही असेच भारी होऊ! लंकेच्या गोऱ्या रावणाची दाही शिरें छाटणारा तो अयोध्येचा राजपुत्र घनश्यामलच होता! तो गीताद्रष्टा सुदर्शनधारी श्रीकृष्णही घनश्याम होता! आजही अर्धजगत् ज्याच्या चरणांची धूळ अंगारा म्हणून मस्तकी धरीत आहे त्या देवकल्प बुद्धाहून कुणी युरोपियन टॉमी अधिक गोरा आहे म्हणून अधिक श्रेष्ठ ठरणारा आहे की काय! जपान्यांना मिशा नसतात म्हणून जसे ते मिशाळ रशियनांहून पौरुषात हीनतर ठरले नाहीत, तसेच आमचा रंग काळा म्हणून

आम्हीही जित झालो नाहीत! एक वेळ जपानच्या वैयक्तिक बुटकेपणामुळे राष्ट्रीय शक्तीला किंचित् कमीपणा येण्याचा संभव असू शकेल; पण आमच्या वैयक्तिक काळेपणाचा किंवा त्यांच्या वैयक्तिक गोरेपणाचा राष्ट्रीय शक्तीशी वा श्रेष्ठकनिष्ठतेशी लवलेश संबंध पोचू शकत नाही.

घनश्याम : आणि वैयक्तिक श्रेष्ठकनिष्ठतेशी तरी काळ्या नि गोऱ्या रंगाचा कोणता मोठा संबंध आहे? आज देखील हिंदी विद्यार्थी युरोप-अमेरिकेच्या कोणत्याही विद्यापीठात गोऱ्या विद्यार्थ्यांच्या रतिभरही मागे नसतो. परकी देशाच्या, भाषेच्या पक्षापाताच्या अडचणींशी त्याला तोंड द्यावें लागत असताही त्या अडचणी ज्यांस मुळीच नसतात त्या गोऱ्या विद्यार्थ्यांमध्ये हिंदी विद्यार्थी व्यक्तिशः अनेक स्थळी उनट, सरसच ठरलेला दिसतो. वैद्यक, निर्बंध, शिल्प, यंत्र, गणित - कोणत्याही विषयात युरोपिअन पीठात हिंदी तरुण पहिल्या दहा क्रमांकातच बहुधा झळकतो - अगदी पहिले क्रमांकही तो अनेकदा पटकावतो. या बौद्धिक समातेप्रमाणेच सैनिक-योग्यतेतही हिंदी सैनिक गोऱ्या सैनिकांशी व्यक्तिशः तुल्यबळ तरी आहेच आहे, ही गोष्ट जर्मन महायुद्धात अगदी युरोपातील ताज्यातील ताज्या शस्त्रास्त्रानी युक्त शूरांतील शूर अशा गोऱ्या जर्मनसैन्याशी आमच्या शीख, गुरखा सैनिकांनी ज्या लढाया झुंजविल्या त्यावरून निर्विवादपणे साऱ्या युरोपने मानली आहे. तीच गोष्ट श्रमिक शक्तीची आहे. मॉरिशसपासून तो ग्वायनापर्यंत, कानडापासून कालिफोर्नियापर्यंत, अति शीत वा अति उष्ण अशा कोणत्याही वायुमानात हिंदी श्रमिक हा त्यास कोणत्याही राजशक्तीचा ममत्वाचा पाठिंबा नसता युरोपियन क्षत्रियांच्या चढाओढीत टिकून राहतो; नव्हे आपल्या साध्या राहणीने आणि कष्टक्षमतेने त्यांना न झेपेल असा प्रतिस्पर्धी बनू शकतो. फिजी, ग्वायना, आफ्रिका, मॉरिशसप्रभृती जगातील अनेक प्रदेशांत दासासारखें करारबद्ध करून नेलेल्या लाखो हिंदी श्रमिकांनी केवळ आपल्या सहिष्णुतेच्या बळावर तिकडे मोठमोठ्या हिंदी वसाहती वसविल्या आहेत आणि ज्या गोऱ्या मळेवाल्यांचे ते दास म्हणून गेले त्यांच्याच तोडीचे धन्याढय मळेवालेही त्या हिंदी श्रमिकांतील कित्येक कर्तबगार पुरुष हळूहळू झालेले आहेत! तेव्हा आमच्या काळ्या रंगामुळे युरोपियन गोऱ्यांच्यापेक्षा कोणत्याही रीतीने शौर्य, धैर्य, बुद्धिमत्ता साह्य, श्रमक्षमताप्रभृती पौरुषाच्या वैयक्तिक गुणात आम्ही लेशमात्र हीनतर ठरलेलो नाही. मग त्या काळ्या रंगास आमच्यातले व्यंग म्हणून आमच्यातील एक उच्चार करण्यासारखी नैसर्गिक उणीव म्हणून आपण कोणत्या अर्थी समजावी आणि कां म्हणून मानावी?

रमाकांत : केवळ ह्या अगदी दुय्यम अर्थीच मी ती मानतो की, त्यामुळे आपल्या शारीरिक सौंदर्यास अंशतः बाध येतो. सौंदर्य हे माणुसकीचा कोणताही महत्वाचा गुण नसले, शौर्य, धैर्य, दया, दाक्षिण्य, प्रमाणिकपणा, जनतत्परता, थोडक्यात म्हणजे शील हे जरी सौंदर्याहून शतपटीने श्रेष्ठ असा सद्‌गुण असले, शील असून सौंदर्य नसले तरी ती उणीव तुच्छ, नि सौंदर्य ओसंडत असले तरी शील नसले तर ते माणूस माणूस नसून राक्षसारखें भयंकर, हे जरी खरें असले तरी शील असूनही सौंदर्य जर असले तर तो मनुष्य देवदूतासारखा शोभू लागतो हेही काही विसरता कामा नये.

घनश्याम : मान्य. पण गोरेपणा म्हणजेच सौंदर्य नव्हे. सौंदर्यातही - शारीरिक सौंदर्यातही - शरीराची सुबक ठेवण, सुरेख अंगलट हीच नुसत्या शुभ्रतेहून, नुसत्या गोरेपणाहून अधिक नयनानंदकारी असते. आणि सुरेख अंगलटीत आणि सुबक तोंडावळ्यात आम्हां भारतीयांचे

सौंदर्य युरोपियनांहून एकंदरीत लवलेश कमी असत नाही. मी मघा म्हटल्याप्रमाणे डुकरें पांढरी शुभ्र असतात - हत्ती काळगे असतात. पण डुक्कर ते डुक्कर - हत्ती तो हत्ती!

रमाकांत : पण हत्ती असूनही जर तो त्यातल्या त्यात शुभ्रही असला तर तो शोभेच्या प्रश्नापुरता तरी अधिक अभिलषणीय ठरणार नाही का? ऐरावत हिमधवल - यास्तव देवांनीही रत्न म्हटला. पांढरा हत्ती हा आम्हीही राज्यलक्ष्मीचें भूषण समजतो! तीच गोष्ट आधुनिक शरीरसौंदर्याच्याविषयी. सुबक वा सुडौल देहयष्टी असूनही त्यांना, हेमगौर किंवा हिमगौर अंगकांतीची देणगी निसर्गाकडूनच लाभलेली असल्याने एकंदर शरीरसौंदर्यात ते श्रेष्ठ ठरतात. कारण काही झालें तरी गोरेपणा हा शरीरसौंदर्याचा एक अनुपेक्ष्णीय घटक आहे आणि काळेपणा हा सौंदर्यास बाधक आहे हे नाकारण्यात काही अर्थ नाही. सोन्यामोत्यांचे अलंकार कोणा काळाकुट्ट शिद्दिणीला घातले तर ती होती त्याहून चांगली दिसेल, पण तिच्या काळ्या रंगास त्या सोन्यामोत्यांच्या तेजाने जसा थोडासा उजळा येतो तसाच तिच्या डांबरी काळ्या छायेने त्यास सोन्यामोत्यांसही किंचित् कळकटपणा आल्याशिवाय राहत नाही. कोण्या ईषत्श्यामल कन्यकेला तेच सोन्यामोत्यांचे अलंकार अधिकच शोभतात आणि ती सोनेंमोतीही सोन्यामोत्यांसारखींच दिसतात. पण एखाद्या गोऱ्यापान कन्यकेला तेच सोन्यामोत्यांचे अलंकार घातले असता तिची कांति खुलते! सौंदर्य असे सांडू पाहते! आणि सोन्याचे अलंकार तिच्या कांतीने सोन्याहूनही पिवळे आणि मोती मोत्याहूनही पाणीदार भासतात ! माणूस हा प्राण्यांचा अनेक गुणांत राजा आहे. सौंदर्यातही सुंदर प्राण्यांचा जेव्हा तो राजा शोभतो तेव्हा ते त्याच्या त्या एकंदर श्रेष्ठतेस अधिकच साजते आणि सौंदर्यातही निसर्गाची राणी साजण्यास मानवी सुंदरतेची सुवर्णप्रभ देहकांति सोन्याच्या कोंदणातच खुलून दिसावयास हवी. मोरासारख्या सुंदर प्राण्यास वा हरणासारख्या सुरेख मृगास एखादी काळी कन्यका कुरवाळीत उभी राहिली तर ती सुंदरतेत त्याची स्वामीनी शोभण्यापेक्षा दासीच भासू लागेल. पण मोरास वा हरिणास कोणी गोरीपान कन्यका कुरवाळीत राहिली तर ती सौंदर्यातही त्याची राणीच साजेल!

घनश्याम : पण मी म्हणतो निदान आपणा आर्यांचा रंग वैदिक काळात तरी हिमासारख किंवा सोन्यासारखा गोरापान होता ही गोष्ट त्या काळच्या वैदिक वर्णनावरून स्पष्ट असताही आमचा रंग पुढे इतका काळा कां पडत गेला?

रमाकांत : त्याची पुष्कळ कारणें सांगता येण्यासारखी आहेत. पण इतर कृष्णवर्णीयांसह झालेले प्रतिलोम, अनुलोम वा संकर-रक्तबीजसंबंधप्रभृती दुय्यम कारणें वगळलीं असता आपण भारतीय आर्यांपुरते तरी आपला गोरा रंग काळा पडण्याचें प्रमुख कारण म्हटले म्हणजे आमच्या देशाचें उष्णतामान हेच होय. म्हणूनच आपल्या देशात काश्मीरसारख्या शीत प्रांतात आजही गोरापान रंग पुष्कळ प्रमाणात टिकलेला आहे - आणि मद्रासससारख्या उष्ण प्रांतात ब्राह्मणही भिल्लासारखे काळवंडून गेलेले दिसतात. जे युरापियन लोक ब्राझिल प्रभृती उष्ण अमेरिकेत किंवा अत्युष्ण आफ्रिकेत वसाहती करून राहिले त्यांचा गोरा रंग एका चारपांच पिढ्यांतच ध्यान्यात येण्यासारखा काळवंडत जात आहे. मग आज पांच हजार वर्षांच्या उष्ण वायुमानाने आम्ही भारतीय आर्य इतके काळवंडलो यात काही आश्चर्य नाही.

घनश्याम : जर आमचा गोरा रंग उष्ण वायुमानाने पांच हजार वर्षात इतका काळवंडला तर तो पुढच्या पांच हजार वर्षात आफ्रिकेच्या शिद्दयांसारखा अगदी कोळशाप्रमाणे काळाकुट्ट

होणार की काय? आणखी एक गंमतीची शंका आज कोळशासारख्या असणाऱ्या शिद्दयांच्या काळ्या रंगावर आफ्रिकेच्या भयंकर, उष्णतेचे ताप बसता बसता तो पुढे माणिकरत्नासारखा तेजःपुंज होऊन उठणार नाही कशावरून? कारण कोळशाचीच कुठे कुठे माणिके, रत्नें होतात म्हणून ऐकतो!

रमाकांत : पण दहा हजार वर्षांनी पुढे माणिकरत्नासारखा चमकदार रंग व्हावा म्हणून आधी पांच हजार वर्षे कोळशासारखीं काळीकुट्ट तोंडें मिरविण्यास सिद्ध आहात का? कोळशाचींच पुढे माणिके होतात ही तुमची क्लृप्ति धरून विचारतो.

घनश्याम : अहो, सिद्ध न होऊन करणार काय? आपण म्हणता तसा जर उष्ण वायुमानाचा हा नैसर्गिक परिणाम असेल तर हिंदुस्थानच्या नागरिकांना दिसवेंदिवस अधिकाधिक काळे पडण्यावाचून गत्यंतरच नाही. अत्यंत क्षुल्लक का होईना पण शारीरिक सौंदर्यांतले हे व्यंग आम्हांस केव्हाही पुसून टाकता वायवाचें नाही. टिकाऊपणात युरोपच्या आम्ही व्यक्तिशः समान वा वरचढ असताही दिखाऊपणात नेहमीच हीन ठरणार! कारण नैसर्गिक वातावरण कोण बदलू शकणार?

रमाकांत : निसर्गच! अहो, निसर्गाचे मनुष्यास सोयीस्कर नसलेले नियम बदलून देणारा प्रतिनियम निसर्गच आम्हांस अनेक वेळा पुरवीत आलेला आहे; विषास प्रतिविष आणि रोगास औषधें देत आलेला आहे!! काळ्या जातीत दोन भेद पाडता येतील. मनुष्याची उत्पत्ति ही वानरा वा मर्कटांचाच विकास मानला तर ह्या प्राण्यात काही लाल तोंडाची, काही काळ्या तोंडांचीं तर काही शुभ्र असतात. ह्यावरून त्यांना मनुष्यपण येऊ लागले, तसे मनुष्यातही त्या वंशपरंपरेप्रमाणे मूळपासूनच काळा, तांबूस वा श्वेतवर्ण उतरला असावा. ज्या मानवजाती कधीतरी गोऱ्या होत्या असा पुरावा मुळीच मिळत नाही, त्यांना हे स्पष्टीकरण लागू पडेल. पण आपल्या भारतीय आर्यांचा रंग मूळचा अगदी ‘हंस’ धवल असल्याची निश्चितिच असल्याने आपण आज काळसर जे पडत चाललो आहो तो मुख्यत्वेकरून उष्ण वायुमानाचाच अर्वाचीन परिणाम असला पाहिजे, अपरिवर्तनीयपणे ठाम झालेला आनुवंशाचा नाही. कारण अजूनही आपल्या अनेक जातीत स्पेन-पोर्तुगिजांइतका तरी गोरेपणा असणारीं माणसें आढळतात. अर्थात् ज्याअर्थी सर्व आर्यांनाच उष्ण वायुमानात राहावें लागले असुनही अद्याप सगळेच अगदी काळे झाले नाहीत तर एका कुटुंबातील भावंडांत सुद्धा काही युरोपातील स्पेन-इटलीत सहज मिसळून जावीं इतकी गोरीं मुले नि काही काळी निपजतात, त्या अर्थी भारतीय उष्णतामानाचा आमच्या मूळच्या गोऱ्या रंगावर होणाऱ्या काळ्या परिणामास हाणून पाडून त्या वातावरणातही गोरेपणा टिकवू शकणाऱ्या मात्रा निसर्गाच्या बटव्यात असल्याच पाहिजेत.

घनश्याम : आपण म्हणता तशी मात्रा सापडणें मनुष्यास शक्य आहे का?

रमाकांतः मनुष्याने आजवर जर कोणच्या शास्त्राकडे अत्यंत दुर्लक्ष केले असेल तर ते गर्भशास्त्राकडे होय. इतर पदार्थांवर आपणास जसे वाटले तसे विच्छेनात्मक वा विश्लेषणात्मक प्रयोग करता येतात तसे गर्भावर करणे अतिदुर्घट हेही त्या दुर्लक्षांचे एक कारण आहे खरेंच. परंतु आता मनुष्याच्या जीवनाशी अत्यंत संबद्ध असताही आज मनुष्यास ज्ञात असणाऱ्या सर्व शास्त्रांत अत्यंत मागासलेले असणाऱ्या त्या गर्भशास्त्राकडेही शास्त्रीय शोधकांचे लक्ष वेधले जाऊ

लागले आहे. मनुष्याची ऊंची वाढविणाऱ्या ग्रंथी कोणत्या, मस्तिष्कातील कोणत्या ज्ञानपिंडांची वा ज्ञानतंतूंची कार्ये कोणती, गर्भावर विभिन्न अन्न-पाणी-प्रकाश ह्यांचे काय विभिन्न परिणाम घडतात. अनुवंशाचा (हेरिडिटी) परिणाम कुठपर्यंत अपरिवर्तनीय समजावा लागेल आणि परिवर्तन (व्हेरिएशन) मग ते शारीरिक असो वा मानसिक - कुठे कसे होऊ शकते, इत्यादी अनेक महत्वाचे शास्त्रीय सिद्धान्त आमच्या ज्ञानाच्या आटोक्यात येत आहेत. मुलगा किंवा जे कोणचें अपत्य हवें असेल तेच नेमके होण्याचा वैज्ञानिक निश्चितीचा नियमही सापडल्यासारखाच आहे. जन्माच्या आधीच गर्भाचा लिंगनिर्णय करता येऊ लागला आहे. इतकेच नसून जन्मानंतरही शस्त्रक्रियादिक उपायांनी लिंगपरिवर्तन अनेक प्रकरणीं करण्यात आलें आहे. कालपर्यंत ज्यांस आपण मेलेले समजून पुरुन वा जाळून टाकू अशा काही हृदयविषयक रोगांनी मेलेल्यांना जिवंत करता येऊ शकते. फार काय, पुरुष संयोगावाचून स्त्रियांस गर्भसंभव नि प्रजोत्पादन नुसते टोचून घेतल्यानेही साध्य आहे ही गोष्ट डॉ. कोएर्नर यांच्या आश्चर्यकारक प्रयोगावरून आता मान्य केलीच पाहिजे असे दिसते. फार नको, आणखी दोनशे वर्षांच्या आत जर शास्त्रज्ञांनी गर्भविज्ञानावर प्रयोगांचा मारा सारखा चालू ठेवला तर आज आपण कपडा जसा हवा तसा बेततो तसा मनुष्य मागणीप्रमाणे घडविता आला ना - इतकी उंची, पुरुष की स्त्री, असा रंग, अशी मुद्रा, असे केस, इतकी बुद्धी, अशी मापें घेऊन मनुष्य घडविता आला ना- तरी मला आश्चर्य वाटणार नाही! कारण निसर्ग हा मनुष्यगठन ज्या अर्थी नियमांनीच करतो त्या अर्थी ते नियम समजताच त्यांत हवी ती निवड करणें मनुष्यास शक्य झालेच पाहिजे. ती शक्ती त्या निसर्गानेच मनुष्यांत ठेवली आहे असा अनेक प्रकरणी - अपवाद वजा जाता - आजपर्यंतचा अनुभव आहे.

घनश्याम : परंतु असे मनुष्यनिर्मितीचे शोध ज्या ज्या शास्त्रज्ञांनी लावले त्यांना रंगपरिवर्तनाचा शोध अजूनही लागला नाही यावरून तो दुर्घटच दिसतो, नाही का?

रमाकांत : त्याचें एक कारण आहे. युरोपियन वैज्ञानिकच आज संशोधनाचे नेते, ते गोरे असल्यामुळे रंगपरिवर्तनाची आवश्यकताच त्यांस नसल्याने त्यांनी त्या प्रकरणी कसून यत्नच केले नाहीत. पण ब्राझीलसारख्या उष्ण प्रदेशात जे गोरे वसाहतवाले काळवंडू लागले आहेत त्यांचे लक्ष गोरा रंग टिकविण्याकडे असून त्यांनी त्या कार्यी पुष्कळ विशिष्ट रसायन टोचल्याने ते पांढरे शुभ्र होतात असे सिद्ध झाल्याचें अलीकडेच ऐकिवात आले. परंतु काळ्या रंगास धुऊन देहास गौरवर्ण करण्याची आवश्यकताच भारतास आज निकडीची असल्याने भारतीय वैज्ञानिकांनीच हा प्रश्न ताबडतोब हाती घेतला पाहिजे. जर ते त्यावर आपल्या बौद्धिक बळाचा मारा सारखा करतील तर प्रयोगांती असे एखादें रसायन सापडल्यावाचून बहुधा राहणार नाही की, जे अंगात टोचले असता वा गर्भात संचविले असता या पिढीचा वा पुढील पिढ्यांचा रंग आमच्या पूर्वजांप्रमाणे पुन्हा गोरापान होऊ शकेल.

घनश्याम : खरोखरच जर असा एखादा रंगपरिवर्तनाचा शोध लागला तर मला तुमच्याहूनही अधिक आनंद होईल! यद्यपि शौर्य, धैर्य युक्ती, दया, दाक्षिण्य प्रभृती माणुसकीच्या कोणच्याही महत्वाच्या टिकाऊ गुणात भारतीय व्यक्ति ही युरोपियन व्यक्तीशी व्यक्तिशः तुल्यबळच ठरते आणि शारीरिक सौंदर्याच्या सापेक्षतः उपेक्षणीय असणाऱ्या दिखाऊ गुणांतही देहाच्या सुरेख ठेवणीत हीनतर ठरत नाही तरीही जो नसल्यास मुळीच नडत नाही, पण

असल्यास हवासाच आहे तो गौरवर्णही जर आम्हांस लाभला तर सोन्याहून पिवळेंच होईल! तर मग आता प्रथम विशेषत: आमच्या भारतीय वैज्ञानिकांचे लक्ष हा रंगपरिवर्तनाचा शोध लावण्याकडे प्रबलपणें वेघण्याचा तुम्ही प्रयत्न करा आणि जिकडे तिकडे प्रसिद्ध जाहिराती फडकू द्यात की, 'पाहिजे! देहाचा काळा रंग बदलून गोरा करणारें रसायन पाहिजे!' हे काम तुमचें. मी म्हटल्याप्रमाणे जो कोणी संशोधक असा उपाय शोधील त्यास दहा लक्ष रूपये निनावी पारितोषिक धाडून देण्याचे काम माझे! माझा पत्ता मात्र कुणालाही लागू दिला न पाहिजे!

रमाकांत : अच्छा; मी माझ्या कामास लागतोच म्हणून समजा पण माझाही पत्ता लागू न देता!

असे म्हणत ते दोघेही अंधारात बेपत्ता झाले!

हा लेखही आमचेकडे प्रेषकाच्या पत्त्यावाचून आलेला आहे.

नाहीतर कोणत्याही मानवी लेखाचा मूळ प्रेषक कोण याचा पत्ता कोणासही लागत नसतोच!!

***

## २.४ गाढव संघटन

गेल्या एकदोन वर्षांमध्ये हिंदू संघटनाची चळवळ जशीजशी प्रबळ होत चालली, तशीतशी तराईच्या रानापासून तो थेट मलबार सिंधुतीरापर्यंत रानारानातून आणि गावागावातून विखुरल्या असलेल्या गाढवी समाजात मोठी खळबळ उडू लागली. हिंदू लोक त्यांच्या भारतीय राष्ट्राची संघटना करीत असता आपण आपल्या गर्दभीय राष्ट्राची संघटना न करता स्वस्थपणे कुंभाराची ओझीं वाहत पडावें, याची गाढवांतील कर्त्या पुढाऱ्यांस लाज वाटू लागून त्यांनीही गाढव संघटनाची चळवळ हाती घेण्याचें ठरविले. त्याप्रमाणे निरनिराळ्या रानांतून भटकत असलेल्या रानटी गाढवांच्या कळपांनी आपआपले प्रतिनिधी निवडून ते नागरिक गाढवांच्या समित्यांतून धाडावे आणि हिंदुस्थानातील कोणत्या तरी मुख्य नगरी प्रतिवर्षी अखिल भारतीय गाढवी ज्ञातीचा एक राष्ट्रीय गोंधळ भरवावा असे ठरून त्यांचीं अधिवेशनेंही भरू लागलीं. त्यांपैकी अगदी काल परवाच भरलेल्या एका सभेची माहिती आमच्या वाचकांस त्या चळवळीचें स्वरूप समजण्यासाठी खाली देत आहोत.

ही सभा भरविण्यासाठी नगराच्या कुंभारवाडयासमोरील विस्तृत उकिरड्यांचें मैदानच निश्चत करण्यात येऊन ते अनेक तरुण गाढवांनी फुंकून फुंकून साफ करून ठेविले होते. या सभेसाठी शेकडो प्रतिनिधी ठिकठिकाणच्या अखिल गाढवीय मजलसइ-आमच्या शाखांकडून धाडण्यात आलेले होते. आरंभ होताच सभेच्या कार्यवाहकाने त्या जमलेल्या गाढवांत जे अत्यंत शाहणें होते, त्याचें नाव सुचविले आणि उनमोदन मिळून ते शहाणें गाढव अध्यक्षपदावर विराजमान झाले. त्यांच्या अध्यक्षीय भाषणात त्यांनी सांगितले की, ‘आपले गर्दभीय राष्ट्र हे वास्तविक पाहता हिंदू राष्ट्राच्याही आधीचें आहे. संस्कृतमध्येही पुराणातून तत्कालीन ज्या अनेक राष्ट्रांचा उल्लेख केला आहे. त्यात किरातातिदक नावांसहच ‘गर्दभा:’ नावाच्या जातीचा उल्लेख येतो. खरें पाहता या भारतभूमीचे मूळचे रहिवासी आम्ही गाढवच आहोत. कारण शास्त्राच्या शोधावरून हं निश्चित झाले आहे की, मनुष्यजात ही गाढवानंतर जन्मास आली . नव्हे, मी तर असे छातीठोकपणे सांगतो की प्रत्येक मनुष्याचें मूल हे जन्मतः गाढवच असते. विकृत शिक्षणाने पुढे गाढवपणास अंतरून माणुसकीच्या परधर्मात ढकलले जाते. या दृष्टीने पाहता प्रत्येक माणसाच्या मुलास या मानवी काफराच्या हातून सोडवून आपल्या गाढव संस्कृतीत परत आणणे हे आपले पहिले कर्तव्यच आहे. माझी दुसरी अशी सूचना आहे की, आपण गाढव मनुष्यापूर्वीच या भूमीचे धनी असल्याने आपण स्वत:स ‘आदिमनुष्य’ म्हणून संबोधू लागलो. मला तर ईश्वराची अशी स्पष्ट आज्ञा झालेली आहे की, ‘जा! हे गर्दभा, तू सर्व जगात आपला गर्दभीय संदेश दे जा!’ या ईश्वरीय स्फूर्तीप्रमाणे मी हिंदुसंघटनाचे अध्यक्ष डॉ. मुंज्यांपासून तों शंकराचार्यांपर्यंत हा माझा संदेश स्वतः नेऊन पोचविणार आहे! वास्तविक पाहता आजपर्यंत शेकडो हिंदू लोक आपण होऊन आपल्या या गर्दभीय संदेशास पाळीत असत. परंतु या हिंदू संघटनाच्या दुष्ट चळीवळीमुळे हिंदू राष्ट्रावर आपल्या गाढवी संस्कृतीचा बसलेला पगडा कमी होऊ लागल्याने आजकाल हिंदू लोकांत गाढवपणा पूर्वीइतका आढळून येईनासा झाला आहे. इतकेच नव्हे तर उलट आपल्यातील कित्येक सन्मान्य गाढव नागरिकांस शुद्ध करून माणुसकिची दीक्षा देत चालले आहेत! त्यांच्या संघटनेचा प्रतिकार करणें, हे आपणा सर्व

अस्सल गाढवांचे पवित्र धर्मकृत्य आहे असे आपण समजलें पाहिजे. हे हिंदुलोक किती वेडगळ आहेत पाहा! ते म्हणतात, 'देवाने त्यांस जो माणुसकीचा संदेश दिला आहे तोच संपूर्ण धर्म होय! त्यांस मी बळपूर्वक असे विचारितो की, कोणाचे कान जास्त लांब आहेत? तुम्हां माणसांचे की, आम्हां गाढवांचे ? जर आम्हां गाढवांचे कान जास्त लांब आहेत हे तुम्हांस नाकारिता येत नाही, तर मग तुमचे कान आखूड आणि आमचेच लांब करण्यात देवाचा काही विशिष्ट हेतू आहे की नाही? तो हेतू हाच नव्हे का की तुमच्यापेक्षा आमचे कान अधिक लांब आणि मोठ्या भोकाचे असल्याने, देवाचे शब्द तुमच्यापेक्षा आम्हांस अधिक लौकर आणि अधिक पूर्णपणे ऐकू यावेत? तुमच्या लहान कानात देवाचा संपूर्ण संदेश मावेना म्हणून तर मग त्याने आमच्या कानांस तो संदेश संपूर्णपणे मावेल इतके मोठें केले ही गोष्ट इतकी स्पष्ट असता हिंदू लोक त्यांच्या माणुसकीसच संपूर्ण धर्म समजून आमच्या गाढवकीस अपूर्ण धर्म समजतात, हा त्या हिंदुंचा केवढा गाढवपणा आहे! छे! छे! हा विचार माझ्या मनात आला की, त्या हिंदू संघटनवाद्यांच्या वल्गनांचा मला अगदी राग येतो! त्यांस खाऊ का गिळू असे मला होऊन त्यांचा असा प्रबळ निषेध करावासा वाटतो.'

इतके बोलताच सात्विक रागाने फुरफुरत त्या अध्यक्षीय गाढवाने चटकन् वळून आणि सभेकडे पाठ फिरवून हिंदुसंघटनाचा प्रबळ निषेध करण्यासाठी इतक्या जोराने दुगाण्या झाडल्या की, त्याच्या पुढचें ते टेबल ताडकन् उडून श्रोतृसमाजावर जाऊन आदळले, त्यासरशी सर्व सभासद 'हिंदुसंघटनाचा जोराचा निषेध करा' म्हणून एकच गर्जना करीत आपआपल्या दुगाण्याही जोराने झाडू लागले. त्या राष्ट्रीय उत्साहाच्या भरात कोणाच्या दुगाण्या कोणास लागत आहेत, याचें कोणाही गाढवास भान उरले नाही. ती सभा कोणत्या पक्षाची आहे हें अगदी माहीत नसणाऱ्या कोण्या अडाणी परस्थासदेखील त्या वेळेस माजलेल्या त्या नुसत्या लाथांच्या सुकाळावरूनच बिनचूकपणे सांगता आले असते की, हा प्यानगाढवीय मजलस-इआम-चाच राष्ट्रीय गोंधळ असला पाहिजे. तिकडे या सभागृहातील शेकडो दुगाण्यांच्या झाडण्याने आणि गर्जनेचे अधिकच उत्साहित होऊन अध्यक्षांचे व्याख्यान प्रबल वेगाने सारखे फुरफुरत चालले त्या अध्यक्षांच्या वक्तृत्वाचे विषयात हात धरील असा त्या उभ्या गाढव समजात कोणीही मनुष्य नव्हता. तो एकदा व्याख्यानाचे भरात गर्जू लागला की, गाढवातल्या सिंहासारखा शोभू लागे.

या गर्जन-तर्जनाच्या भरात ती सभा अशी अगदी रंगून गेली असता, एकाएकी दोन चार मनुष्यें त्या सभेत अत्यंत नम्रपणाने हात जोडून आत येताना दिसली. त्यासरशी अध्यक्षाने त्यांस हटकून विचारले की, 'तुम्ही कोण? गाढवांच्या राष्ट्रीय गोंधळात येण्यास तुम्हांस कोणी परवानगी दिली?'

'विश्वप्रेमाने!' ते गृहस्थ नम्रपणाने म्हणाले, 'विश्वप्रेमाने आकर्षित होऊन आम्ही तुमच्यांत मिसळण्यासाठी आलेलो आहो. मनुष्य काय, आणि गाढव काय, एकाच ईश्वराची लेकरें आहेत. ही माणुसकी आणि गाढवकी अशा धर्माधर्माच्या आणि संस्कृतिसंस्कृतीच्या नसत्या कल्पनांनी वेडावलेले लोक गाढवांत आणि माणसांत निष्कारण वैरभाव माजवीत आहेत, ते आम्हांला संमत नसल्याने आम्ही आपणांस अशी विनंती करतो की, यापुढे आमच्या तुमच्यांत अगदी जातिधर्मनिर्विशिष्ट भावनेने प्रेरित झालेली एकी स्थापित व्हावी.'

हे शब्द ऐकताच एक वृद्ध गाढव म्हणाला, ''पण हे तुमचें कपट कशावरून नसेल? ते हिंदुसंघटनाचे पुरस्कर्तेही जीवमात्रांच्या एकीच्या अशाच तात्त्विक गप्पा मारीत असतात. पण आम्ही जेव्हा त्यांचेकडे एकी करण्यास गेलो आणि म्हणालो की, एकी हवी तर तुम्ही तुमच्या माणुसकीच्या आकुंचित संस्कृतीस सोडून आमच्या गाढवी संस्कृतीस अंगीकारा, संस्कृतीस सोडून आमच्या गाढवी संस्कृतीस अंगकारा. तेव्हा त्यांचे ते एकीचें कपट उघडकीस आले. कारण ते साफ सांगू लागले की, 'गाढवांनी माणुसकी धरावी, हाच एकीचा खरा मार्ग आहे; माणसांनी गाढव व्हावें हा नव्हे! कारण मानवीय संस्कृती ही गर्दभीय संस्कृतीहून श्रेष्ठ आहे!' अशा प्रकारचे तुम्ही कोणी हिंदुसंघटक नसाल कशावरून?'

'आमच्या वर्तनावरून!' ती तीन-चार माणसें म्हणाली. 'आमच्या वर्तनावरून आम्ही माणसें आहोत की गाढवें आहोत याची आपण परीक्षा करू शकाल.' तेव्हा अध्यक्ष म्हणाले, 'वर्तनावरून परीक्षा करावयास फार वेळ लागतो. त्याविरहित तुमच्या वर्तनावरून तुम्ही 'गाढवें की माणसें' ही परीक्षा करण्याचें ज्ञान येण्याइतका शिक्षणाचा फैलाव आमच्या गाढव ज्ञातीत अजून झालेला नाही. तेव्हा जर तुम्ही विश्वप्रेमाने खरोखरीच प्रेरित झालेले असाल, तर तुम्ही बाह्य वर्तनातही आमच्या गाढवी संस्कृतीप्रमाणे चालले पाहिजे. गाढवांनी मनुष्यासारखें वागावें म्हणजे एकी होईल हा हिंदुसंघटनाचा उपदेश लुच्चेपणाचा आहे. विश्वप्रेमाचा जर तुम्हांस खरोखरच उमाळा आला असेल तर तुम्ही माणसांनी गाढव कां होऊ नये?'

'अवश्य व्हावें, त्यात काय आहे!' ते नवागत मनुष्य म्हणाले, 'आम्हीही हिंदू आई-बापांचे पोटी जरी जन्मलो आहोत, तरी त्या हट्टी हिंदुसंघटनवाद्यांशी आमचा काहीएक संबंध नाही. विश्वप्रेम हाच आमचा धर्म असल्याने आपल्या गाढवी संस्कृतीचा अवलंब करूनही आम्ही आपणांशी एकी स्थापित करू इच्छितो. हा मानव आणि हा गाढव, ही खुळी कल्पना आम्ही त्याज्य समजतो.'

'मग मात्र तुम्ही गाढव समाजात समाविष्ट होण्यास योग्य आहोत!' अध्यक्ष म्हणाले. 'तरीही हडसून खडसून घ्यावें म्हणून स्पष्टपणे तुम्हांस पुनः एकदा विचारतो की, तुम्ही पूर्वीची हिंदूंची मानवी संस्कृती सोडून आमची गाढवी संस्कृती स्वीकारण्यास सिद्ध आहात काय?'

'हो, हो, हो. विश्वप्रेमाचे उपनेत्र लावल्यापासून आम्हांला माणुसकीत आणि गाढवकीत काहीएक फरक दिसत नाहीसा झाला आहे.' ते सर्व मनुष्य ओरडले.

तेव्हा आनंदाने उल्हासित होऊन अध्यक्ष गर्दभाचार्य आपल्या अखिल गर्दभबंधूस म्हणाले, 'सभ्य गृहस्थ हो! पूर्वी शेकडो हिंदू आपल्या गाढवी संस्कृतीचा स्वीकार करीत आलेच आहेत. या हिंदुसंघटनाच्या दुष्ट चळवळीमुळे तो ओघ बराच सुकत चालला. तथापि अजूनही या हिंदू मनुष्यांसारखे काही मनुष्य, विश्वप्रेमाने का होईना, पण आपल्या गाढवी संस्कृतीचे अनुयायी होऊ इच्छित आहेत, ही थोड्या उत्साहाची गोष्ट नाही. यापुढे या आलेल्या माणसांस आपण गाढवच समजावें. आणि हे मनुष्य हो, तुम्हीही यापुढे आम्हा गाढवांशी समरस होऊन जाण्यासाठी आम्ही चालतो तसे चालावे. तर चला, तुम्ही नुसत्या मागच्या पायांवर उभे न राहता तुमचे पुढचे पाय जे तुम्ही हातासारखे उचलून धरीत असात, तेही टेकून चारी पायांवर उभे राहा.'

त्या आज्ञेसरशी ते सर्व गृहस्थ आपल्या हातास भुईवर टेकून चारी पायांवर चालू लागले. परंतु त्यांस प्रथम नीट चालता येईनासें पाहून सर्व गाढव 'खो खो' हसू लागले. इतक्यात तो वृद्ध गाढव पुन: म्हणाला, 'हां! गाढवांनी सभ्यतेचें असे उल्लंघन करू नये. या नवीन गृहस्थांस सभ्यतेचें असे उल्लंघन करू नये. या नवीन गृहस्थांस गाढवासारखें चालावयास शिकवावें की तसे एकालाही चालता येत नाही म्हणून हसावें? बरें, आता यांचें आखुड कान आपल्यासारखे लांब केले पाहिजेत; नाही का? ते जरा ओढले पाहिजेत. तुम्हांस लागणार तर नाही ना?

गृहस्थ म्हणाले, 'छे छे, आमचे कान आजवर कित्येकांनी असे ओढलेले आहेत. आम्हांस त्याची अगदी सवय आहे. आपण अमाचे कान ओढावे.' तेव्हा त्या सभेतील दोघा पुढारी गाढवांनी ते कान तोंडात धरून थोडे बहुत ओढलेही परंतु ते अधिकाधिक लांब होणाच्या स्थली अधिकाधिक लालच होत आहेत हे पाहून अध्यक्ष गर्दभाचार्य किंचित् रागाने त्या कान ओढणाऱ्या गाढवांस म्हणाले, 'किती गाढव आहात तुम्ही, राहू द्या ते. ओढून का कान वाढतात? प्रत्यही त्या कानांचे मुळाशी उद्यापासून पाणी घालीत जा म्हणजे ते वाढतील. आता हे नवागत बंधूंनो, गाढव संघटनेच्या मुख्य कार्यकारी मंडळाने आमच्या गाढवी संघटनेच्या मुख्य कार्यकारी मंडळाने आमच्या गाढवी संस्कृचा फैलाव करण्यासाठी काही शिक्षणसंस्था काढण्याचें ठरविले आहे. त्यात तुम्ही अध्यापकाचें काम कराल का? गाढवांची मागासलेल्या जातीत गणना न होता तुम्हां हिंदूंतील तुमच्यासारख्या पुढारलेल्या जातीत गणना व्हावी अशी आमची महत्वाकांक्षा आहे. म्हणजे आमच्या जातीशी तुमच्या जाती आपण होऊन रोटीबोटी-व्यवहार देखील करतील.'

'करतील असे कशाला म्हणता? हे आम्ही, ते सर्व काही आत्ता देखील करावयास सिद्ध आहोत.' उत्साहाने ती नवागत मनुष्ये म्हणालीं, 'तुम्ही नवीन संस्था काढण्याच्या भानगडीत कशास पडता? आमच्या स्वत:च्या शिक्षणसंस्था विश्वप्रेमाच्या पायावरच आम्ही उभारलेल्या असल्याने, त्यात आम्ही मुलामुलींस 'माणुसकी आणि गाढवकी' यात काहीच फरक नाही असे शिकवीतच असतो. त्यातच आपण आपल्या बुद्धिमान गाढव मुलांमुलींस धाडावें. माणसात आणि गाढवात काहीएक फरक न मानिता सर्व एकाच निराकार इश्वराची लेकरे आहेत, हे सक्रिय रीतीने सिद्ध करण्याचा विडाच आम्ही उचलला आहे. यासाठी आमच्या मुलींनी एक विश्वप्रेमी संघ स्थापिला असून त्यांनी प्रतिज्ञाच केल्या आहेत की, - वरीन तर गाढवालाच वरीन. नुसत्या व्याख्येत विश्वप्रेम न ठेवता ते 'शुनि चैव श्वपाके च समदर्शी' होऊन प्रत्यक्ष आचरून दाखवीन!'

हे ऐकताच त्या सभेतील श्रोतृवृंद हर्षातिरेकाने एकसहाच गर्जना करू लागला. अध्यक्षही प्रसन्न झाले आणि सर्वजणांनी त्यांच्या समाजात येऊ इच्छिणाऱ्या या नवागतांचे मन:पूर्वक स्वागत करीत म्हटले, 'ज्या आपणांस गाढवपणाचा आमच्याहूनही अधिक अभिमान वाटतो, त्या आपणांस आम्ही आमच्या जातीचेच समजत आहोत. या, असे या.' अध्यक्ष म्हणाले, 'आज माणुसकीवर गाढवकीचा विजय झाला आहे. आमचें गाढव-संघटन हिंदुसंघटनाचें लवकरच नाक कापील! आता आज बराच उशीर झाल्याने सभा संपविली पाहिजे.' अध्यक्षांचे भाषण संपताच कार्यवाहाने अध्यक्षांचे आभार मानिले नि म्हटले, 'गर्दभाचार्यांसारखा आमच्या गर्दभीय संस्कृतीचा अभिमानी विरळाच सांपडेल. त्यांच्यात आमच्या गाढवपणाचें सर्व

शहाणपण एकवटलेलें आहे. आम्हा गाढवांत इतका थोर गाढव आजपर्यंत झालाच नाही. त्या जातीच्या आणि त्याचप्रमाणे आम्हा गाढवांशी बेटीव्यवहारही आजच्या आज करण्याचें नीतिधैर्य ज्यांनी दाखविले त्या ह्या नवागत माणूस-गाढवांचेही मी आभार मानीत आहे.'

शेवटी गाढव-संघटनाच्या जयजयकाराच्या आकाश दुमदुमवून टाकणाऱ्या खिंकाळ्यात ती पॅन-गाढवीय-मजलस-इ-आम ची सभा विसर्जन पावली.

***

## २.५ शेंदाडपूरचा शिवाजी उत्सव

गेल्या पंधरवड्यात नागूजीरावांच्या जिवाची एकच तारांबळ उडालेली होती! कारण त्यांच्या वास्तव्याने पावनलेल्या शेंदाडपुरात ह्या वर्षापासून शिवाजी-उत्सव प्रथमच चालू करण्याचा बेत ठरला होता.

महाराष्ट्रातल्या अनेक नगरांतून जरी शिवाजी उत्सव गेल्या पंचवीस वर्षांपूर्वीपासून होत आला असला तरी शेंदाडपूरच्या नागरिकांनी आजवर त्याच्याकडे जी पाठ फिरवलेली होती ती काही त्यांना त्या उत्सवाला तोंड देण्याची छाती नव्हती म्हणून नव्हे. पुण्याकडचे कुचेष्टेखोर लोक तसे हिणवत; पण शेंदाडपूरचे नागरिक आजवर तो उत्सव जो करीत नव्हते त्याचें मुख्य कारण असे होते की, पहिली कित्येक वर्षे तो उत्सव काही संशयित वर्तनाच्या लोकांनी काढलेली एक जाती-जातीत वैमनस्य फैलावणारी टूम होती. उत्सवात भाग घेणें हे त्या वेळी सुखरूप सभ्यतेचे किंवा बिनधोक नि अनपवाद राष्ट्राभिमानाचें कृत्य समजले जात नव्हते; पण आता त्या उत्सवातील विष काढीत काढीत तो अगदी पाण्याहून पातळ, पाणी तेरा रंग कैसा - जिसमें मिलेगा वैसा, असा झाला, त्यात राष्ट्रातील वाटेल त्या माणसाला आता भाग घेता येऊ लागल्यामुळे त्याला पूर्णपणे राष्ट्रीय स्वरूप आले आहे. त्यात आता हिंदू, हबशी, इरणी, तुराणी प्रभृती हिंदुस्थानातीलच काय, पण जगातील कोणच्याही जातीच्या सभ्य गृहस्थास मनमोकळ्या, सुखरूपपणे, बिनधोक सामावता येते. गव्हर्नर-कमिशनर-देखील त्याचे अध्यक्ष होऊ शकतात. खानसाहेब, मुल्लाजी, पाद्री मुख्य वक्ते होण्यास नाकारीत नाहीत, असे अत्यंत शुद्ध राष्ट्रीय स्वरूप त्यास आले. तेव्हा आता शेंदाडपूरच्या राष्ट्राभिमानी नागरिकांना तो हवासा वाटू लागला. यामुळेच पूर्वी त्या उत्सवापासून दहा पावले दूर राहणाऱ्या नागूजीरावांसारख्या गृहस्थांनीही ह्या वर्षापासून ‘शिवाजीमहाराज की जय’ असे प्रकटपणे गर्जून गर्जून त्या शेंदाडपूरचें वातावरण दुमदुमविण्यात दोन पावले सगळ्यांपुढे राहावयाचें असे नक्की ठरविले होते. त्यातही नागूजीरावांचे कवित्व त्याच उत्सवात जगतासमोर प्रथमच प्रकटावयाचें होते! त्यायोगे तर शिवाजीमहाराजांविषयी नागूजीरावांचा अभिमान त्यांना सळो की पळो करून सोडता झाला. उत्सवाविषयी सर्व लोकांत अपूर्व उत्साह संचरविण्यासाठी उत्सवमंडळाचे ते कार्यवाह श्रीयुत कविवर नागूजीराव हे जातीने गावभर हिंडत होते; ‘शिवाजीमहाराज की जय’ असे घरोघर जाताना गर्जत होते. परत जाताना ‘माझे प्रथम काव्यगायनही ह्या समारंभात आहे’ असे गुणगुणत होते.

या उत्सवासाठी दोन कविता रचण्याचें कार्य दोन वर्षांपूर्वीच नागूजीरावांनी हाती घेतले होते.

पण कविवर नागूजीरावांच्या त्या दोन कवितांचे बांधकाम पुरें व्हावयाचें होते. रचना चाललीच होती, याविषयी नागूजीरावांना मोठा अभिमान वाटे. ते म्हणत, ह्यावरून शिल्पापेक्षा काव्याची श्रेष्ठता किती मोठी आहे हे कसे आपोआप सिद्ध होते पाहा! काव्य म्हणजे काही दगडाचुन्याचें बांधकाम नव्हे! ताजमहाल बांधावयास जीं अनेक वर्षे लागलीं नाहीत; ते दगडी बांधकाम काय एका दहा दिवसांचे! पण वर्षानुवर्षे जीं लागलीं ती त्या ताजमहालच्या भिंतीभिंतीवर नि खांबांखांबांवर जीं काव्यमय चरणें कोरलेलीं आहेत ती काव्याची अक्षरें

कोरण्यास होत! तरीदेखील ती चरणें रचायचीं नव्हती, नुसती कोरायची होती. पण मला तर त्या दोन कविता मुळातच रचावयाच्या होत्या. त्यांचें बांधकाम पायातील धोंड्याच्या भरीपासून तो कळसाच्या दगडापर्यंत 'एकहाती' करावयाचें होते. (नागूजीराव 'एकहाती एकटाकी! 'असेच' म्हणणार होते. पण त्यांच्या त्या दोन कवितांच्या बांधकामात कमीत कमी दोनशे बत्तीस टाक झिजून गेले होते; खुडाखुड झालेले एकशे बेचाळीस चवरखे कामास आले होते!)

कवि होण्याचा निश्चय नागूजीरावांनी दोन वर्षांपूर्वी जो केला त्याचें असे झाले होतें. नागूजीरावांना स्वतःच्या असामान्य बुद्धिमत्तेविषयी नि कर्तृत्वाविषयी असलेल्या दांडग्या आत्मविश्वासामुळे आपण जगात कोणच्या तरी नात्याने अलौकिक नाव मिळविणार असे त्यांना नेहमी वाटत असे. त्यांनी प्रथमतः प्रो. परांजप्यांचा बडेजाव ऐकून रँग्लर होण्याचा निश्चय केला. पण दशांश अपूर्णांकाची धोंड दुर्दैवाने हायस्कूलमध्ये आडवी आल्यामुळे त्यांना ती वाट आरंभीच सोडावी लागली. इंग्रजी चौथीत असताना त्यांनी दोन वर्षे तीत उत्तीर्ण व्हावयाचा प्रयत्न चिकाटीने केला आणि तिसरें वर्षही ते चौथीत घालविणारच होते. पण मॅट्रिक होऊन तरी काय दस रूपडीची नोकरीसुद्धा मिळत नाही असे जेव्हा त्यांना कळले, तेव्हा 'साठाव्या वर्षापर्यंत बसत राहीन, पण या जन्मी मॅट्रिक झाल्यावाचून राहणार नाही,' अशी चौथीच्या मास्तरांपुढे जी कृतनिश्चयी प्रतिज्ञा ते करीत असत, ती मोडण्यास उत्तम निमित्त सापडले नि वयाच्या बाविसाव्या वर्षी त्यांनी इंग्रजी चवथीतून नाव काढून शाळा सोडली. पुढे एका व्यापाऱ्याला सट्टयात खूप पैसे मिळाल्याचें ऐकून त्यांनीही घरची होती नव्हती ती पुंजी सट्टयात घातली, ती त्यातच गडप झाली. त्यांनी घेतलेल्या लॉटरीच्या तिकीटांचा तर पत्त्यांचा जोडच झालेला होता आणि त्यापायी खिशाची चाळणी झाली होती. त्यांनी अलौकिकत्व संपादण्यासाठी मध्यंतरी एकदा सार्वजनिक चळवळीत भाग घेतला. प्रथम फेटा फेकून देऊन खादी टोपी घातली; नंतर ती फेकून देऊन केस फिंदारून बोडके हिंडले. पण आधीच डोक्यावर केस फार थोडे उरलेले असल्यामुळे टक्कल पडलेल्या त्यांच्या त्या डोक्याला त्या पक्षातही समरस होता आले नाही.

अशा स्थितीत वैतागून गेले असता त्यांनी त्याची कहाणी त्यांचे एक मित्र छंदोपंत यांना सांगितली नि म्हटले, की 'माझ्यात अलौलिक होण्यासारखे अनेक गुण आहेत हा माझा ठाम सिद्धान्त झालेला असताही मला अजून जगात काहीच कसे होता येत नाही! याला काय करावे?' हे ऐकताच छंदोपंत म्हणाले, 'मित्रा, तुला काहीच होता आले नाही हे अगदी खरें ना? वेड्या, तर मग कवि होण्यास तू योग्य असलाच पाहिजेस! तू कवि हो! मीही असाच भटक भटक भटकलो; काहीच साधेना, तेव्हा कविता करू लागलो; आणि आता पाहातोसच की, मला गेल्या कविसंमेलनात त्यांनी किती गौरविले. छंदोपंत ही एक पदवी तरी मला शेवटी पटकवता आली!'

'हो रे हो! पण, कविता करायची म्हणजे त्याचें शास्त्र हवें शिकायला! जर का दशांश अपूर्णांकासारखें प्रकरण त्यात पुन्हा आडवें आले-'

'छट्! कवितेच्या शास्त्रात अपूर्णांकाचा प्रश्नच येत नाही! कवि हा स्वयमेवच एक पूर्णांक आहे! तुला सांगतो ऐक. काव्यशास्त्राचें शास्त्र एका सूत्रामध्ये! ते पाठ केलेस की सारें पाठ

केलेस! ज्याला शास्त्रच नाही ते काव्य, ही त्याची व्याख्या; आणि 'निरंकुशाः कवयः' हे त्याचें सूत्र! कवीचे जन्मसिद्ध-ताम्रपट !!'

'ठीक ठीक! पण कवीला अंकुश नसला तरी छंदोबंधनाचा लगाम तरी असतोच ना कोणचासा?'

'छंद ! - बंध? जाळून टाक ते बंधही! तेवढीदेखील अडचण कवींना उरु नये म्हणून तर मी मुक्तबंध नावाच्या कविमंडळाचा सभासद झालो आहे. कवींना बंधनच जर नाही, जर कवि जन्मजात निरंकुश म्हणजे वदतो व्याघात नव्हे काय? तू मुक्तबंध छंदातच कविता कर. गद्याच्या ओळी तुला लिहिता येतात ना! त्या सरळ न लिहिता एकाखाली एक लिहीत गेलास, की मुक्तबंध छंद साधला!'

'वा! तोड पण काय सुचविलीस! अडचण पण टळली आणि कालिदासापासूनच्या साऱ्या लौकिक कवीपेक्षा आपली अशी काही तरी अलौकिक अपूर्वाई पण आपल्या कवितेला लाभणार! अडचणीवाचून अलौकिकता! बरें, छंदांचा प्रश्न सुटला; पण काही झाले तरी कवितेमध्ये शिष्टांच्या कानाला गोड लागावे असे संस्कृत शब्द म्हणे पुष्कळच घालावे लागतात. आता मला संस्कृत येतच नाही असे नाही; पण कोणचा शब्द संस्कृत नि कोणचा असंस्कृत हे ओळखणें तेवढें बरेंच जड जाते. त्यातही तो भाषाशुद्धीचा कायसा एक बाष्कळ वाद काही उपद्रवी लोक घालीत आहेत म्हणे! त्यांच्या उपद्रवामुळे 'दिल,' आदमी' 'दुनिया' असे अगदी शुद्ध संस्कृत शब्ददेखील कवितेत घालण्याची चोरी झाली आहे! आमच्या तोंडी तर छप्पन भाषांचे इंग्रजी, उर्दू, होटेंटाट, तुर्की शब्द खिळलेले सट्टेबाजारात, गोदीवर, चोरबाजारात ही बाजारी बोलीच तुमच्या शुद्ध संस्कृतापेक्षा किंवा किंग्ज इंग्लिशपेक्षा आमच्या जास्त उपयोगी पडते. ती बाजारी बोली म्हणजेच आजची माझी मातृभाषा! पण तीत कविता चालेल काय?'

'होय तर! अरे, ती बाजारी बोली तुला खरंच छान येते का? तर मग वेड्या, भविष्यकाळाचा महाकवी होण्यात तूच आघाडी मारणार! अरे, आता कोण विचारतो त्या भूतकालाच्या संस्कृताला नि भाषाशुद्धीला? त्या शिवाजीचें नि त्या चिपळूणकरांचे ते भाषाशुद्धीचे खोबरें होणार! आता राष्ट्रीय भाषेची जागा कोण घेणार, आहे माहीत? न ज्ञानेश्वराची मराठी न टागोरांची बंगाली न तुलसीदासांची हिंदी! ही सट्टेबाजारातील बाजारी भाषाच आता राष्ट्रपदाच्या महत्पदावर चढणार आहे. अरबी, तुर्की, पारशी, यहुदी, पुर्तुगीज, फ्रेंच, इंग्रजी-कमीत कमी इतक्या भाषांचे प्रतिनिधी शब्द तीत असणार! त्या त्या हिंदू, मुसलमान, यहुदी, ख्रिश्चन प्रभृती हिंदुस्थानातील नागरिकांच्या संख्येच्या प्रमाणात प्रत्येक प्रांतांतील बोलीत ते ते विदेशी शब्द मूळच्या स्वदेशी भाषांतून घेतलेच पाहिजेत! उदाहरणार्थ, बंगालीतले शेकडा हिंदू शब्द इतके; शेकडा मुसलमानी शब्द इतके शेकडा मुसलमान तितके, शेकडा ख्रिश्चन वसती तितके इंग्रजी-पुर्तुगीज-फ्रेंच शब्द! त्यातही मुसलमानी समाजाचा ते मागसलेले आहेत हा एक मोठा सदगुण, एक मोठी अधिकारार्ह थोरवी, त्यांनी आमच्यावर केलेला एक मोठा उपकार असल्यामुळे त्यांच्या उर्दू शब्दांना विशेष प्रतिनिधित्व त्या राष्ट्रभाषेत मिळाले पाहिजे ही गोष्टही ठरलेलीच. तेव्हा जर तुला खरोखरच सट्टेबाजाराची नि चोरबाजाराची भाषा येत असेल, तर तीत पुष्कळ उर्दू नि थोडे इतर शब्द असल्यामुळे तू तुझी नवी कविता बेधडक तीतच करू लाग! टागोरांची बंगाली कविता बंगाल्याबाहेर कोण वाचतो. पण तू जर त्या भावी राष्ट्रीय भाषा

होणाऱ्या उर्दूबहुल बाजारी भाषेत कविता करशील तर ती तुझी बाजारी कविता साऱ्या हिंदुस्थानात घरोघर वाचली जाईल. थोडक्यात म्हणजे, तू उठ नि कविता करू लाग!'

त्या तडाख्यासरशी नागूजीराव लगेच उठले नि घरी जाऊन त्यांनी दोनचार कविता, - पहिली पुस्ती म्हणूनच, मराठी भाषेत - रातोरात रचूनही टाकल्या. मुक्तबंध छंदातच ते रचावयास गेले असताही ती कविता नकळत छंदोबद्ध होऊन पडली. आद्य कवीचेंही असेच झाले होते. ते शोकसंतप्त होऊन ओरडावयास गेले तों अनष्टुप रचून बसले!

'परकी शब्दांना मराठी प्रत्यय लागले की झाले ते शुद्ध मराठी!' या दिग्विजयी शास्त्राधारें रचलेल्या त्या कवितेची थोडीशी वानगी म्हणून काही चरणें खाली देत आहोत -

(चाल : बाजीराव नाना ! तुंबडीभर दाणा !! अशी काहीशी)

रोमान्सच्या राज्यांत चल मारू लांब मजल !!

प्रिये तूं पोएट्री ॲंड मी एक तुझी गजल !!

इष्काने मी बेजार झालो टेक ना माझी दाद !!

गल्लोगल्ली शाउटेन तुझा खादी झिंदाबाद !!

स्पीक एक वर्ड तरी! रडतो धाय धाय !!

रिक्वेस्ट नको रिजेक्टूं ही चाटिन तुझे पाय !!

दिलाच्या गोठ्यांत दयेची जी गाय !!

फुटूं दे ना पान्हा तिला ! डोंट मी ॲनॉय !!

स्तोत्रे, स्वीट हार्टे ! तुझीं सिंगतो बारबार

खुदी तूं माझी मी तुझा खुदाइ खिदमतगार !! १

या कवितेच्या 'दिग्विजय' मराठीस मूर्ख लोक पूर्वी हसले. पण आज अनेक कवी आपल्या मराठी कवितेत खुदाई खिदमतगार आणि झिंदाबाद हा शब्द उघडपणे खरोखरीच योजीत असतात ही गोष्ट गेल्या अनेक वर्षांतील काही मराठी मासिके चाळताच वाचकांचे ध्यानात येईल.

त्या कवितेमुळे नागूजीरावांचें नाव कविमंडळात चमकू लागले असले तरी त्यांना उघड सभेत स्वतःचें काव्य स्वतःच गाऊन दाखविण्याची संधी भाषाशुद्धीवरल्या जुन्या कवींच्या मत्सरामुळे आजवर कुठेही मिळाली नव्हती, ती शेंदाडपूरच्या ह्या आजच्या शिवाजी-उत्सवात शक्य तितक्या प्रचंड प्रमाणावर साजरी करण्यासाठी नागूजीरावांनी त्याचें कार्यवाहपद स्वतः स्वीकारून एक अत्यंत मनोरंजक नि भपकेबाज कार्यक्रम आखला होता.

पण तो कार्यक्रम उत्सवमंडळाकडून संमतवून घेताना सत्कार्याला नेहमी येतात, तशाच अनेक अडाचणी आल्या होत्या. प्रथमतः त्या जिल्ह्याचे लोकप्रिय कलेक्टर मि. ब्लॅकस्टोन यांनी या सर्व सरकारी नोकरांना उद्देशून जे एक परिपत्र (Circular) काढले होते, त्याचा विचार करावा लागला. या परिपत्रात असे लिहिले होते की,-

'शिवाजीच्या उत्सवास जर खरें खरें राष्ट्रीय स्वरूप आलेले असेल तर त्यात सरकारी नोकरांनी भाग घेण्यास हरकत नाही. खरें खरें राष्ट्रीय स्वरूप म्हणजे असे की, त्या उत्सवाच्या कार्यक्रमात मुसलमान, ख्रिस्ती, यहुदी, युरोपियन यांचेही सर्व प्रतिनिधी स्वसंतोषाने येऊ शकतील असा त्याचा कार्यक्रम हवा. सरकारी नोकर नि नागरिक या दोघांनाही आजची शांतता नि सुव्यवस्था यांना धक्का न पोचेल असाच काय तो भाग शिवाजीच्या चरित्रातून निवडून त्या उत्सवात लोकांच्या पुढे आदर्श म्हणून ठेवावा. आजची या राष्ट्राची स्थिती शिवाजीच्या वेळच्या स्थितीहून अवनत झाली आहे, म्हणून ती सुधारण्यास शिवाजीने यावें असा कोणचाही राजकीय बाष्कळ उल्लेख त्यात असू नये. फार तर आजची सुधारलेली शांतिसौख्यमय राष्ट्रीय परिस्थिती ही त्या काळच्या धामधुमीच्या, लुटालुटीच्या, हाणामारीच्या, रानटी परिस्थितीहून किती वरचढ आहे आणि आज शिवाजी असता तर तोसुद्धा शांततेचे नि शिक्षणाचे लाभ पाहून आधी जाता प्रायमरी स्कुलांत, मग हायस्कुलात नि शेवटी रामकृष्ण मिशनात, अशा अर्थी काय तो शिवाजी-उत्सवात सद्यः परिस्थितीचा उल्लेख झाल्यास व्हावा! नाहीतर केवळ ऐतिहासिक दृष्ट्या त्या काळी घडलेल्या गोष्टींचाच तेवढा खल करावा आणि त्या शिवाजीच्या उत्सवाचा समारोप Rule Britania! Britania rules the waves! अशा कोणच्यातरी उत्कृष्ट नि अनाक्षेपार्ह साम्राज्यगीतात केला जावा, अशा कार्यक्रमाने जो जो शिवाजी उत्सव होईल त्यात सरकारी नोकरांनी भाग घेण्यास हरकत नाही - नव्हे घ्यावाच.'

कलेक्टरचें हे परिपत्र म्हणजे नागूजी कवीच्या काव्यावर एक वज्राघात होता! कारण त्या शिवाजी-उत्सवासाठी त्यांनी जी एक अत्यंत उद्दीपक कविता केली होती ती कलेक्टरांच्या परिपत्रात नको म्हटलेल्या थाटाचीची होती! 'भूमाता कसायांच्या सुऱ्याखाली हंबरते आहे - धाव! विजापूरच्या रस्त्यात ती गाय सोडविलीस तशीच हे शिवराया, हीही गाय सोडीव, ये!' इत्यादी दहापांच ओळी तर अशा जाज्वल्य होत्या की, निदान दोन हजार टाळ्या तरी पडल्याच असत्या! पण अरेरे!! नागूजी कवीला त्या ओळी गाळून टाकाव्या लागल्या! कारण तशी कविता ठेवली तर सरकारी अधिकारी येणार नाहीत आणि तो शिवाजी उत्सव करावयाचें धाडस शेंदाडपूरच्या सभ्य नागरिकांनी जे ह्याच वर्षी केले ते त्यात सरकारी अधिकारी आताशी येतात ह्याच आधारावर अवलंबून. उत्सवमंडळाचे अध्यक्ष रावबहादूर पोटाळे ह्यांनी साफ सांगितले की, शिवाजी उत्सवास जर राष्ट्रीय स्वरूप द्यावयाचें, तर राष्ट्रातील अत्यंत महत्त्वाचा वर्ग जो सरकारी अधिकारी तो त्यात असलाच पाहिजे आणि अराष्ट्रीय शिवाजी-उत्सव आपल्याला करावयाचा नाही! तेव्हा सर्वानुमते तसेच ठरले. साऱ्या कार्यक्रमातून सरकारी परिपत्राने आखून दिलेला भागच काय तो ठेवला. शिवाजी महाराजांच्या चरित्राविषयी केवळ ऐतिहासिक चर्चा करणारें निबंध, भाषणें, कविता - ह्याच काय त्या नव्या कार्यक्रमात समावेशिल्या. हे कळताच उत्सवाचे अध्यक्षपद घेण्याचें स्वतः कलेक्टर महाशय मि. ब्लॅकस्टोन यांनी मान्य केले.

तोंच दुसरी अडचण दत्त म्हणून उभी राहिली! शिवाजीच्या चरित्रातील ऐतिहासिक घटनांचे वर्णन निषिद्ध नाही म्हणून नागूजी कवीने अफझुलखानवधावर कवित करावयाचें ठरविले. अगदी इतिहासाला धरून तेवढेंच बोलणे, सद्यः परिस्थितीचें नाव नाही, अशी दोन कडवीं रचलीहीं आणि स्वागतमंडळाच्या बैठकीत रावबहादूर पोटाळ्यांच्या पूर्ण संमतीने त्यांनी नवीन कार्यक्रम वाचून दाखविला! त्यांत अफझुलखानाच्या वधावरील आपला पोवाडाही गाइला जाईल

असे वाक्य नागूजीरावांनी जेव्हा उच्चारले तेव्हा अकस्मात् अफझुलखानाच कोणत्या अंगात संचारुन डुरकाळावा तसे डुरकळत ‘Stop ! Stop that humbug’ असे कोणीसें ओरडून उठले. पाहतात तो खानबहाद्दर फाजलखानसाहेब! उत्सवमंडळाचे उपाध्यक्ष!

त्या खानबहाद्दर फाजलखानांनी मोडक्या तोंडक्या मराठीत साफ सांगितले की,

हिस्ट्रीबिस्ट्री को आग लगा दो ! मुसलमानांना कमीपणा येईल असे एकही अक्षर उत्सवात निघता कामा नये, काफर शिवाजीका नाम भी हम नही सुनना मॉगते! लेकिन क्या करे! कलेक्टरसाबनी चिठ्ठीच धाडली की राष्ट्रीय सोरूपचाच काय ते कार्यक्रम आहे तेव्हा तुम्ही बेशक या, म्हणून मी त्या बुतपरस्त शिवजी का नाव तेवढा ऐकण्याचा मान्य केला. तो तुमने ए क्या बदमाषी मचाई है! अफझुलखानाचा वध क्या! वधबिध आम्ही काही सुनेंगे नहीं! इतिहासच कशाला हवा, या तमाशात! अफझुलखानानेच शिवाजीचा वध केला असा काही कविता रचून म्हणा हवं तर! नहीं तो हम चल देंगे!’

‘हां हां ! खानबहाद्दर! ठैरिये, माफ करिये! ऐका तर खरें. आम्ही तुमचें सारें म्हणणे मान्य करतो. मग झाले ना?’

असा निकाल रावबहादूर पोटाळे ह्यांनी दिला. त्यासरशी नागूजी कवीचा अफझुलखानाचा पोवाडाच काय, पण वीररसांचें असे कोणतेही काव्य शिवाजीच्या इतिहासापुरते तरी निषिद्ध ठरले! मनात चरफडत पण वरवर सौम्यपणे नागूजीराव कार्यवाह त्या नात्याने जिज्ञासले - ‘तर मग शिवचरित्रपर असे शिवाजी-उत्सवात काहीच बोलू नये हे उत्तम. घडलेला इतिहाससुद्धा सांगणें आता रद्द केले पाहिजे, नाही का? शिवाजीविषयक हे सारे ऐतिहासिक निबंध परतवितो तर!’

रावबहादूर पोटाळ्यांनी थोडा विचार केला. नंतर ते म्हणाले, ‘थांबा. शिवाजीच्या चरित्रातील जो भाग खानबहादूरांना नापसंत तेवढा गाळला की झाले. मुसलमानांच्या भावना न दुखवील असा भाग शिवाजीच्या चरित्रातून पुष्कळ काढता येईल, काय खानबहादूर, तुम्हीच तो निवडून द्यावा.’

त्याप्रमाणे त्या राष्ट्रीय शिवाजी-उत्सवात मुसलमानांच्या भावना न दुखतील असे जे शिवचरित्र वाचावयाचें म्हणून खानबहाद्दुरांच्या संमतीने ठरविले ते एकश्लोकी रामायणाप्रमाणे अगदी चार चरणांचेंच होते. ते असे -

शिवाजी हा शहाजी नावाच्या मुसलमानांच्या एका अंकित सरदाराचा पुत्र होता. त्याच्या आईचें नाव जिजाबाई. तो कोणत्या तरी एका तारखेस (सन १६२० ते १६३० च्या मध्यंतरी) एका वर्षी जन्मला. (जन्मतिथी वर्ष वादग्रस्त असल्याने राष्ट्रीय उत्सवात दोन्ही पक्षांना सामावता यावें म्हणून नक्की तिथी नि वर्ष सांगितलीं नाहीत.) जन्मल्यानंतर बरेच दिवस जगून तो सन १६८० त मृत्यू पावला!

या सर्वसंमत झालेल्या राष्ट्रीय शिवचरित्रावरही खानबहाद्दुरांचा एक अभिप्राय नोंदला होता. तो असा की, शिवाजी जन्मला हीच गोष्ट मुसलमानांच्या भावना दुखविते; पण राष्ट्रीय हिताकडे

दृष्टि देऊन आणि कलेक्टरसाहेबांच्या शब्दास मोडू नये म्हणून, येवढ्या उल्लेखाकडे मुसलमान बंधूंनी दुर्लक्ष कराण्याची सहिष्णुता दाखवावी.

हे शिवाजीचें राष्ट्रीय चरित्र राष्ट्रीय शाळांतून शिकविण्यास हरकत नाही असा, शिवाबावनीस रद्द केल्यानंतर गांधीजींच्या कलास अनुसरुन नागपूर राष्ट्रभाषासमितीनेही निर्वाळा दिला.

परंतु नागूजी कवीपुढे जो मुख्य प्रश्न होता तो कसा सोडावयाचा? आता शिवाजी उत्सवात ह्या नव्या राष्ट्रीय कसोटीस उतरेल आणि मुसलमानांनाही मानवेल असे काव्य कोणत्या विषयावर करावयाचें? इतक्यात त्यांना एक युक्ती पण युक्ती, सुचली! शिवाजी-उत्सव म्हणजे पराक्रमाचा, विक्रमाचा. बदललेल्या परिस्थितीत विक्रमाचें क्षेत्र बदलेल; पण थोरवी बदलणारी नाही. तेव्हा त्याच्या परिस्थितीत जो विक्रम तो शिवाजीने केला; तसा आजच्या परिस्थितीत जो विक्रम तो आज करणारा मनुष्यही अशा उत्सवात सन्मानिला जाण्यास सत्पात्र असलाच पाहिजे. त्याच्यावर कविता रचून तीच ह्या उत्सवात गावी!

सुदैवाने त्या शेंदाडपुरातील नागरिकांतच असा एक विक्रम करणारा वीर नुकताच उदयास आलेला होता. तेथील नरू न्हावी नावाच्या एका तरुणाने चोवीस तास सारखा वस्तरा चालविण्यात जागतिक उच्चांक पटकवला होता! शेकडो लोकांचे केस भादरता भादरता शेवटी डोकी करणारा, दाढी करणारा, मिशा काढणारा मनुष्य जेव्हा मिळेनासा झाला तेव्हा त्याने म्हशी भादरण्यास लगोलग आरंभिले! पण चोवीस तास वस्तरा नी कातरी जी सारखी चालविली होती ती खाली म्हणून ठेवली नव्हती! साऱ्या जगातील न्हाव्यात श्मश्रु करण्यात त्याने उच्चांक पटकावून केस भादरण्याचा हा जो विक्रम केला त्यामुळे महाराष्ट्राचें नाव या युगातही उज्जवल झाले होते. युरोपातही विक्रम करतात. पण युरोपातील लोकांत असलीं खरींखुरी पौरुषाचीं कृत्यें करून त्यात उच्चांक पटकावण्याची धमक कुठली असणार! त्यांचे विक्रम म्हणजे फार फार तर अटलांटिक महासागर उडून जाण्याच्या स्पर्धेत, नाहीतर असल्याच दुसऱ्या कोणच्यातरी पोरखेळात असणार! विमान चांगले असले ती कोणीही उडवेल! तो यंत्राचा प्रताप, पौरुषाचा नव्हे! पण चोवीस तास सारख्या बिड्या ओढीत किंवा सारखा चहा ढोशीत किंवा सारखें केस भादरीत राहण्यात पुरुषशक्तीचा खरा प्रताप व्यक्त होतो. कारण तेथे यंत्रबळाचा प्रश्न नसून हस्तबळाचा वा श्वासबळाचा वा पोटबळाचा प्रश्न असतो. त्यांतही केस भादरण्याच्या चिकाटीत उच्चांक पटकावणें, रेकॉर्ड करणें, हे तर निर्भेळ पौरुषी कृत्यच होय! कारण की आमच्या इकडे स्त्रिया अजून सहसा केस कापून घेत नसल्यामुळे आणि दाढीमिशा तर त्यांना फुटतच नसल्यामुळे चांगली गुळगुळीत जर कोणाची उडवायची, जर कोणाची मिशी उतरून द्यायची, जर दाढी उपटायची, तर ती बहुधा पुरुषाचीच उपटावी लागते! केस भादरण्याच्या कृत्याचा मुख्य संबंध पुरुषाशीच असल्यामुळे ते खरें खरें पौरुषी कृत्य ठरते. हजामतीत उच्चांक पटकावणें हाच निर्भेळ पौरुषी विक्रम ठरतो! हे सारे विचार कवितेमध्ये घालायचे असे योजून कवीने कार्यक्रमात तो भाग प्रसिद्धही केला.

‘चोवीस तास सारखे केस भादरण्यात जागतिक उच्चांक ज्याने पटकावला आहे, त्या श्मश्रुविक्रम करणाऱ्या नरू न्हाव्याचा गौरव! आणि त्या वीरावरील नागू कवीचें प्रशस्तिकाव्यगायन! या! पाहा! ऐका! अशीं प्रसिद्धके (जाहिराती) भडक रंगात जिकडे तिकडे

फडकताच शिवाजी-उत्सवाच्या दिवशी मंडळींची नुसती रेटारेटी झाली! मुंगीस जागा नाही असा समाज लोटला!

त्यातही तो राष्ट्रीय शिवाजी-उत्सव! हिंदूच काय पण मुसलमान, यहुदी, पारशी, सरकारी, निमसरकारी, बिनसरकारी मनुष्यमात्र चिकार दाटले! शिवाजी उत्सवासच काय पण कोणत्याही प्रश्नास असे राष्ट्रीय स्वरूप दिले असता तो किती थोर पदास पावतो, राष्ट्रीय एकी कशी आपसूक साधते त्याचें ते प्रात्यक्षिक होते!

उत्सवास शेवटीं एकदाचा आरंभ झाला! अध्यक्ष स्वत: कलेक्टर मि. ब्लॅकस्टोन साहेब होते. त्यांनी रावबहाद्दुर पोटाळ्यांना शिवाजींचे चरित्र सांगावयास आज्ञापिले. त्यांनी ते वर दिलेले चार ओळी चरित्र कसेबसें वाचले. तोंच प्रेक्षकांतून 'हुश! हुश ते पुरें! नरु न्हावी कुठे? नागू कवी उठा!' म्हणून गलका चालला. तेव्हा नागू कवी लगेच उठले आणि प्रेक्षकांच्या वर्तनाचें समर्थन खणखणीत शब्दांमध्ये करीत म्हणाले,

'शिवाजींचे चरित्र ऐकण्यास तुम्ही इथे आलेला नाही हे मी जाणतो. मराठी शाळेतील क्रमिके पुस्तके, इतिहास, पोवाडा, नाटक, कादंबऱ्या, जे पाहावे त्यांत शिवाजीचें चरित्र चिताडलेले असतेच. ते ऐकून ऐकून तुमचे कान खरोखरीच विटले आहेत! शिवाजीचें आजच्या राष्ट्रीय कर्त्या पिढीला अजीर्ण झाले आहे! त्यांना आता ज्यापासून आज उपयोगी पडेल अशी स्फूर्ती मिळविता येईल असा कोणीतरी अद्ययावत् विक्रमी पुरुष हवा होता! आजच्या राष्ट्रीय कर्त्या पिढीला हा जुनापुराणा विक्रमी शिवाजी काय शिकविणार? जे लोक त्याचें चरित्र गातात तेच सांगतात की, आजच्या परिस्थितीत शिवाजीच्या चरित्रापासून काही भलते-सलते करण्याचा गाढवपणा न करणें हाच शहाणपणा होय! तेव्हा पूर्वकालीन एक थोर पुरुष म्हणून शिवाजीमहाराज जरी समजले गेले होते तरी त्यांचा उत्सव करण्यापलीकडे आज त्यांच्या विक्रमांचा आम्हांस काय उपयोग आहे? आज ज्या सुधारलेल्या विक्रमांचा प्रत्यक्ष उपयोग आहे असेच विक्रम आजच्या पिढीच्या पुढे आदर्श म्हणून धरावयास हवेत! तशाच एका विक्रमी वीराचा गौरव आज आम्ही करणार आहो! - तो वीर हा पाहा !- (असें म्हणताच पडद्यास सारून पवित्र्याची उडी मारीत नरू न्हावी पुढे येतो.) - हा पाहा तो नरू न्हावी! (टाळ्यांचा प्रचंड कडकडाट ! त्यासरशी नागू कवी बेभान भडकून ओरडतात -) त्या रायगडाचा तो पाहा जुना शिवाजी!- आणि हा पाहा आमच्या शेंदाडपूरचा अद्ययावत् शिवाजी! ह्याचा वस्तरा त्या जुन्या शिवाजीची भवानी तरवार तळपत नव्हती असा तळपत आहे! ह्याची ही धोपटी अर्जुनाच्या अक्षय्य भात्यासही खाली पाहावयास लावीत आहे! जर आज शिवाजी महाराज असते तर त्यांनी Misguided patriotism ची ती भवानी तरवार फेकून देऊन या नरू न्हाव्याचा हा Spiritual Safety Razer च हाती घेतला असता यात मला काडीचीही शंका वाटत नाही!

इतक्यात खोक्यांच्या सजवलेल्या उतरंडीवरील महाराजांची तसबीर धक्का लागल्यासारखी कोलमडली नि तिला सावरण्यास श्री. लुडबुडे पुढे होतात तों ती तसबीर गदगद हालू लागली. खालचें खोकेही करकरून डगमगले. दोघेतिघेजण ते पुन्हा पक्के बसवू लागले. इकडे नागू कवी भाषणाच्या आवेशात वक्तृत्वाच्या अत्युच्च शिखराच्या अगदी कडेलोटावर येऊन गर्जू लागले, 'आज जर शिवाजी येईल...!-'

इतक्या धाड्धाड्धाड्! तोफा एकदम सुटाव्या तसा एक मोठा धडाका उडाला. सारे उत्सवगृह गदगद हालू लागले. त्या तसबिरीखालची ती उतरंड कड्कड्कोसळली ! - आणि तसबिरीतून कवचकुंडल मुकुटासहित भवानी तरवार उपसलेले प्रत्यक्ष शिवाजी महाराज ‘हरहर महादेव’ गर्जून उभे ठाकले!

महाराज सिंहासारखे गरजले -

‘कोण म्हणाले आत्ता की ‘जर का आज शिवाजी इथं येईल?’ हा मी इथे आलो आहे! बोला काय हवें तें?’

त्या सिंहगर्जनेसरशी सारी सभा थरथर कापू लागली! खानबहादुर फाजलखानसाहेब, तोबा तोबा! दगा! फिसाद! असे ओरडत वाक्पीठावरून उडी टाकून वाट फुटेल तिकडे पळत सुटले. रावबहादुर पोटाळे खुर्चीवरच्या खुर्चीवरच थंडे झाले. एवढा धीट इंग्रज तो कलेक्टर ब्लॅकस्टोन, पण त्या अद्भुतासरशी अंधारी येऊन तोही चक्करला! सुरतेच्या एका वखारीत आपण आहोत, मराठ्यांच्या नंग्या तरवारी चारी बाजूंनी चालून येत आहेत, टेबल होतें ते नाहीसें होऊन तिथे पोत्यांची रास दिसत आहे असे त्या घेरीत मि. ब्लॅकस्टोन ह्यांना भासून ते त्या पोत्यांच्या राशीच्या आड म्हणून टेबलाखाली जाऊन दडले.

बिचारा नागू कवी! मटकन् खालीच हबकत होता; पण महाराजांनी त्याचा एक कान चटकन् ओढून त्यास उभा केला नि विचारले, ‘काय रे, मला कशाला यावें म्हणून बोलावीत होतास? काय भकत होतास! अं?’

ततत... पपप करीत नागू कवि म्हणाला, ‘म-म-महाराज श-श-श क्षमा करावी! आपण याल असे ठाऊक असते तर बापजन्मी आपल्याला बोलावण्याचें साहस केले नसते. ‘ये शिव भूपाला!’ अशा कविता जो तो गातो म्हणून मीही तसे काहीसें बोलून गेलो! म-म-म-मला च-च-च चक्कर येते आहे! पाया पडतो, कान सोडावा! मूर्च्छित पडू द्यावें या दासाला काही वेळ!’

‘ठीक!’ महाराज हसले- ‘सोडतो तुम्हांला, पण ध्यान्यात धरा तुम्ही सारेजण की, जर पुन्हा कोणी कोणत्याही शिवाजीउत्सवात ‘ये’ म्हणून म्हटलेत तर मी शिवाजी महाराष्ट्रात पुन्हा खरोखरीच येईन!’

‘नको! नको ! महाराज! दुसरी वाटेल ती शिक्षा द्यावी; पण असली भयंकर शिक्षा महाराष्ट्राला देऊ नये! आम्हांला फार फार तर शिवाजी-उत्सव झेपतो; पण शिवाजी झेपणार नाही! आमच्या पिढीला हा नरू न्हावी आहे त्याचा विक्रम आम्हांस पुरे! त्याचा Razor Safety त्याला किंवा शेळीच्या दुधावर वाढलेल्या कुठल्याही दुसऱ्या शेळपटाला आमचा शिवाजी करा; पण महाराज, आपण सिंहीणीच्या दुधावर वाढलेले सिंह! आपण स्वतःच येण्याचा धाक आम्हां बापड्यांना घालू नका! नुसते शिवाजी उत्सव करू आम्ही हवे तितके!’

‘नाही! शेंदाडपूरच्या शेणकिड्यांनो, तुम्हांला शिवाजी नको हे तुमचें म्हणणे बरोबर आहे! पण म्हणून तुम्ही यापुढे केव्हाही शिवाजी-उत्सव करता कामा नये. जर पुन्हा असला एखादा

राष्ट्रीय शिवाजी-उत्सव करून चंद्रराव मोऱ्यासारखी आमची विटंबना कराल तर- पाहिलेत हे काय ते!’

लाख विजांचा लोळ तुटावा तसा असह्य प्रकाश तळपून भवानीच्या त्या झोतासरशी सभा मूर्च्छित पडली!

नागू कविही मूर्च्छित पडले. पण मधूनमधून... माझी कविता... अरे कवितागायन... तसेच राहिले! ...कविता!’ असे चमकून काही वेळ बडबडतच होते!

***

## २.६ देवसकी आणि माणुसकी

कोकणात देवसकी हा शब्द अगदी सगळ्यांच्या तोंडी बसलेला आहे. याचा पारिभाषिक अर्थ असा की, पटकी (कॉलरा), प्लेग. अवर्षणें, दुष्काळ, देवी, विषम, भूकंप प्रभृती ज्या मोठमोठ्या आपत्ती येतात, त्या देवाच्या रागाने येतात आणि त्यांच्या निराकरणाची सोप्यातली सोपी आणि अमोघांतील अमोघ युक्ती म्हणजे त्या त्या रागावलेल्या देवाची वा देवीची मनधरणी करणें. प्लेग आला की दे बहिरोबाला बोकडांचे बळी; पटकी आली की मार मरीआईच्या नावे कोंबडी; पाऊस पडेनासा झाला की धर शिवलिंगावर संतत धार किंवा कर रुद्राची वा वेदातील पर्जन्यसूक्तांची पारायणें! बेडूक देवतेला ज्यात स्तविले आहे आणि 'हे हिरव्या बेडका, प्रसन्न हो, पाऊस पाड!' इत्यादी स्तुतीनी ज्यात बेडूक देवतेस वशिष्ठ ऋषीने प्रार्थिले आहे ते सूक्त म्हटल्याने पाऊस पडतो हे वेदांचें वचन, ही वेदोक्त 'देवसकी' होय. सर्वारिष्टशांतिप्रीत्यर्थ 'श्रीराम जयराम जयराम राम' हा मंत्र कोटी वेळा जपला की झाले काम, भरतखंडावरील आजच्या सर्व आपत्ती, अरिष्टें घालविण्याचा हा तोंडगा, ही पुराणोक्त देवसकी होय. देवास गाऱ्हाणें लावण्याचा कोकणात एक घरीदारी आढळणारा प्रघात आहे. मराठे, भंडारी, ब्राह्मण, महार प्रभृती गावकरी गुरवाकडून कोणत्याही रोगराईत वा संकटात 'देवास फुले' चढवतात! आणि अमुक बाजूचें फूल पडेल तर अमुक कारण असे ठरवून वाट पाहतात. त्या बाजूचें फूल पडले की तेच कारण! किंवा गुरव-बुवा-संत-महालक्ष्मी यांच्या अंगात आणून विचारतात, 'देवा' प्लेग का झाला? आग का लागली? पटकी का झाली? पाऊस कधी पडेल?' ते अंगात आलेले गुरव-बुवा-महालक्ष्मी जितके शहाणे वा शंख असतात, तशींच उत्तरें येऊन बिचारा देवही तितकाच शहाणा वा शंख ठरतो. वैद्यकीय किंवा वैज्ञानिक कारणांची लवलेश माहिती नसलेल्या ह्या अंगात आलेल्या गुरव-बुवा-महालक्ष्म्यांची कारणें नि उपाय बहुधा ठरीव भाबडटपणाचीं असतात. प्लेग का झाला? की ठरीव उत्तर 'बहिरोबाचे बोकड बळी थकले आहेत! मरीआईला कोंबड्या गेलीं पांच वर्षे पोटभर मिळाल्या नाहीत! म्हणून प्लेग आला, पटकी चेकाळली!! पाऊस पडेनासा झाला!!!' ही झाली प्राकृत देवसकी. सर्व प्रकारच्या देवसकीतील मुख्य निष्ठा, मूलतत्त्व हेच की, कोणत्याही रोगांच्या साथी, आपत्ती, सृष्टीक्षोभ ह्या घटना देवाच्या रागामुळे वा लोभामुळे घडतात. ती देवाची 'लहर' होय. सृष्टीचा अबाधित नियमागत 'क्रम' नव्हे, आणि त्या प्रकरणी बचावाचा उपाय म्हणजे देवाची हांजीहांजी, पूजा-प्रार्थना, श्राद्धादिक पारलौकि आचारपालन, यज्ञ, बळी, इत्यादी देवतांना प्रसन्न करण्याचे प्रकार, आधिभौतिक उपाय नव्हेत, तर आधिदैविक.

### २.६.१ ब्राह्मणांना मृत्यू कां येतो?

मनुस्मृतीत पांचव्या अध्यायाच्या आरंभीच महर्षीनी 'अनलप्रभवं भृगुम्' प्रश्न केला की, 'कथ मृत्यूः प्रभवति वेदशास्त्रविदां प्रभो? !!' ब्राह्मणांना मृत्यू का येतो? त्यावर भगवान भृगुंनी उत्तर केले, 'श्रुयताम्येन दोषेण मृत्युर्विप्रान्जिघांसति!! अनभ्यासेन वेदानाम्आचारस्य च वर्चनात्आलस्यादन्नदोषाच्चमृत्युर्विप्रान्जिघांसति!!' वेदांचा अभ्यास केला नाही, 'आचार' सोडले, अन्न'दोष' घडला नि आळस वाढला की वेदज्ञ विप्रांना मृत्यू येतो. या उत्तरात सर्व कारणें आधिदैविक कशीं आहेत हे तत्काळ ध्यानांत येईल; आणि म्हणूनच प्रत्यही व्यवहारात ती कशीं खोटीं पडतात त्याचेंही आश्चर्य वाटणार नाही. 'आचार' म्हणजे स्नानसंध्या,

पितृतर्पणादी धार्मिक आचार; 'अन्नदोष' म्हणजे काय हे लगेच त्याखालच्या श्लोकांतूनच सविस्तर सांगितले आहे. लसूण, कांदा खर्वस, खीर प्रभृती पदार्थ विप्राने खाल्ले असता तो तत्काळ 'पतित' होतो, नंतर नरकात जातो हा अन्नदोष, आणि अशा धार्मिक अर्थाच्या अन्नदोषापासून, आचारत्यागापासून आणि वेदाभ्यास न केल्यामुळे मृत्यू येतो! ह्या धार्मिक नि आधिदैविक कारणमीमांसेला आधिभौतिक कारणमीमांसेने, म्हणजेच विज्ञानाने एखाद्या प्रकरणी साफ खोटे पाडले की त्या प्रकरणी 'देवसकीचा प्रांत संपून 'माणुसकीचा' प्रांत लागतो.

लसूण, कांदा, काही रोगांवर उपकारक, त्या रोगांवर तो घेतल्याने ब्राह्मण कांदा, लसूण, खर्वस, दोडके जन्मभर खात असता, मनुस्मृतीतील शंभर सव्वाशे 'अन्नदोष' प्रत्यही करीत असता, दीर्घायुषी होतात, तत्काल तर केव्हाही मरत नाहीत; आणि लसूण, कांदा न खाणारे तडकाफडकी साथीसाथीतून मरताना आढळतात! प्लेगची पिसू कोणी ब्राह्मण ऋग्वेद वाचीत बसला म्हणून त्याला डसावयाची थोडीच थांबली आहे आणि तेवढ्या वेळात वेद कोणत्या कोणत्या ब्राह्मणांनी वाचला नाही त्याचा शोध काढीत त्यांना त्यांनाच डसत चालली आहे, असें काही आढळत नाही. प्लेग, पटकी, देवी टोचली की वेद न वाचणारे आणि मनुस्मृतीतील आचार नि अन्नदोष न मानणारे शेकडा नउशे नव्याण्णव ब्राह्मण जगतात. अगदी वेदाभ्यासरत शक्यतों स्नानसंध्याशील, अन्नदोष सापेक्षतः अधिक टाळणारे आस्तिक ब्राह्मण प्लेग, पटकी, देवी ह्यांच्या तडाख्यासरशी जर टोचून घेतलेले नसले वा भौतिक औषधें सेविलीं नसलीं तर बहुधा शेकडा नव्वद पटापट मरतात! हा प्रत्यही, प्रत्यहीचा अनुभव मनुस्मृतीच्या 'देवसकीस' काय किंवा आमच्या कोकणातील 'गाऱ्हाणाच्या' आणि गुरवांच्या देवसकीस काय, एक धर्मभोळें खूळ यापलीकडे काहीही महत्त्व देईनासा होता.

रोग, भूकंप, उत्पात हे सर्व सृष्टीक्रमाच्या अबाधित कार्यकारणभावाचे परिणाम आहेत; ते नियम आपणांस ज्या प्रमाणात कळतील त्या प्रमाणात नि त्या त्या प्रकरणी सृष्टीच्या त्या उत्पातापासून मनुष्य आपले संरक्षण करू शकेल; देवसकीच्या प्रार्थनेने, पूजेने वा नैवेद्याने सृष्टीक्रम केव्हाही बदलू शकत नाहीत; रोगाचें औषध प्रयोगांनी अमोघ ठरले की प्रार्थना न करणारे वा धार्मिक पापपुण्य न मानणारे लोकही त्या रोगापासून बचावले जातात. हे ज्ञान म्हणजेच विज्ञान. मनुष्याला झालेल्या सृष्टीनियमांच्या ज्ञानामुळे मनुष्याची सत्ता ज्या मानाने वाढते त्या मानाने देवसकीचे प्रस्थ कमी होऊन माणुसकीचें स्वामित्व प्रस्थापिले जाते. मनुष्य अनमानधपक्याच्या, दैवी उपायांच्या नादी न लागता निश्चित नि अमोघ अशा मानुषीय आधिभौतिक उपायांवर अवलंबू लागतो.

या अर्थी जीं जीं राष्ट्रें 'देवसकी'च्या धर्मभोळ्या पायरीस ओलांडून 'माणुसकी'च्या पायरीवर चढतात आणि मनुष्याच्या प्रयोगसिद्ध नि प्रत्यक्षावीगम्य ज्ञानाने खोट्या पडलेल्या 'धार्मिक' छापाच्या समजुती तत्काळ सोडतात ती राष्ट्रें सृष्टीच्या जीवनकलहात तगतात.

आजच्या सर्व राष्ट्रांमध्ये जर कोणी या देवसकीच्या अनमानधपक्याच्या युगातून माणुसकीच्या विज्ञानयुगात प्रवेशले असेल, भरभराटत असेल तर ते युरोपीय जनपदच होय.

पूर्वीच्या सर्व धर्मग्रंथात - मग ते वेद असोत, बायबल असो, वा कुराण असो - देवसकीच्या अनमानधपक्याचेंच प्रस्थ माजलेले सापडते. त्या काळी ते अगदी साहजिक होते.

दोनशे वर्षांपूर्वी युरोपमध्येही भूकंप, रोग, उत्पात देवाच्या रागानेच होतात; प्रार्थनेने, पूजेने तंत्रमंत्राने शमतात हीच ख्रिस्ती धर्माची शिकवण, हीच देवसकी बोकाळलेली होती. लिस्बनला फ्रेंच राज्यक्रांतीच्या आधी भूकंप झाला तेव्हा तो प्रॉस्टेटंट लोकांच्या 'पापाने' झाला आणि त्यांच्या प्रायश्चित्ताने शमेल अशीच दंगल झाली! प्रॉटेस्टंटांचा त्यापायी छळ झाला! फ्रेंच राज्यक्रांतीनंतर मात्र युरोप झपाट्याने विज्ञानवादी बनू लागले. सृष्टीनियमांचें ज्ञान हेच त्यांचें शास्त्र, हाच त्यांचा धर्म होत चालला आणि देवसकीची राजवट संपून माणुसकीची राजवट चालू झाली. परिणाम हा झाला की, पूजा-प्रार्थना, धूपदीप, धार्मिक अर्थीचें पापपुण्य यांना सर्व मनुष्यांत अगदी कमी प्रमाणात भीक घालणारा युरोप आज सर्व मनुष्यांमध्ये समर्थ, निरोगी दिर्घायुसंपन्न नि जगत्सम्राट होऊन बसला आहे.

परंतु ख्रिस्ती देवसकीतून युरोप जसा मुक्त झाला. तसा आशिया अजूनही झालेला नाही. भारतीय हिंदू काय, मुसलमान काय, बुद्ध हिंदू काय, हजारो वर्षांपूर्वीच्या धार्मिक छापाच्या ग्रंथात जे अनमानधपक्याचें सृष्टीज्ञान नि अज्ञान ग्रथिलेले आहे, त्याच्या बाहेर पाऊल टाकणें हेच मुळी पाप मानीत राहिल्याने ते हिंदू  नि मुसलमान आजही याच भाकड देवसकीत फसलेले आहेत. पटकी, देवी, प्लेग प्रभृती भयंकर रोगांच्या साथीवर रामबाण लसी दीडशे वर्षांपूर्वी मनुष्यांस माहीत नव्हत्या. मग वेद, अवेस्ता, बायबल, कुराण, प्रभृती जुन्या धर्मग्रंथांच्या काली त्या साथींनी हजारो माणसें मृत्यूच्या झपाट्यासरशी नुसती झाडून नेलीं जात तेव्हा पैगंबरांच्याही बुद्धी कुंठित होऊन कुराण नि बायबलाच्या पानोपानी त्यांनी आक्रोशावें की, 'हा देवाचा राग! निमाज पढा, प्रार्था, पूजा तर त्यात काय आश्चर्य!' मुसलमानांना वाटावें महंमद पैगंबरांलाच खरा नि अनन्य पैगंबर तुम्ही मानीत नाही म्हणून देवाने ही साथ धाडली! ज्यूंना वाटावें, मूर्तीपूजा केली म्हणून साथ आली. 'पाप' झाले हींच साऱ्यांची निदानें आणि उपाय, उपचार. सृष्टीच्या वैद्यकग्रंथांत पाहता प्रकाश, शुद्ध वायु, शुद्ध पाणी, जंतुघ्न औषधे हे प्रत्यक्ष उपचार कोणी तितक्या नेटाने सांगेना - की जितक्या तावातावाने, जपजाप्य, संततधार, पीर-पैगंबरपूजा, ताईत, तावीज, गंडेदोरे यांचा उपदेश ते देत. त्या वेळच्या मनुष्यांच्या सृष्टीज्ञानाच्या अभावी ते तितकेसें अस्वाभाविकही नव्हते. पण त्यायोगे मनुष्याची दिशाभूल जी झाली ती मात्र ह्या पटकीच्या साथीपेक्षाही मनुष्यास मारक ठरली! भाबडेपणाची 'देवसकीची' ही साथ अजूनही थांबत नाही. पटकीवर औषध जसें विज्ञानास सापडले, तसेच या देवसकीच्या साथीवरही माणुसकींचें औषध आता युरोपला तरी सापडले आहे. ते आपल्या इकडेही आणून मनुष्यास टोचले पाहिजे. इतर लसी अंगात टोचतात. भाबडेपणाच्या साथीवरील ही वैज्ञानिक लस मनुष्याच्या मनात टोचली पाहिजे! देवसकीच्या दुष्परिणामांची उदाहरणें यासाठींच वारंवार प्रसिद्धिली पाहिजेत. पटकी, प्लेग यांच्या साथीप्रमाणेच या देवसकीच्या भाबडेपणाची साथही शेकडो लोकांचे प्राण मृत्यूमुखात कसे ढकलते याचा अनुभव आपल्या देशात पावलोपावली आजही येतो!

थोड्याच काळापूर्वी रत्नागिरीकडे देवीची साथ आली. हिंदूंमध्ये सरसहा टोचणें चालू झाले. त्या लसीच्या टोचण्याने हिंदूंत कोणी फारसें दगावले नाही. पण मागासलेल्या मुसलमान वस्तीत अज्ञान, अशिक्षितपणा नि धर्मभोळेपणा एकंदरीत हिंदूंपेक्षा अधिक. त्यामुळे तशा अडाणी मुसलमान वस्तीत कोणी टोचून घेईना. जो तो पीरांना नवस, गंडेदोरे, यांच्यावर

अवलंबे. तोंच साथ बळावून पटापट माणसें मरू लागली. ज्या जाणत्या मुसलमानांनी टोचून घेतले ते निरोगी राहिले, हे प्रत्यक्ष दृश्य पाहिल्यावर देवसकी लटपटली आणि ते अडाणी मुसलमानही भराभर टोचून घेऊ लागले, वाचले. याच देवसकीच्या मूर्खपणामुळेच रत्नागिरीकडील दाभोळें (ता. संगमेश्वर) या लहानशा गावी महारवाड्यात अज्ञ महारांतही मोठा कहर उसळला. त्यांच्या सुदैवाने रत्नागिरीचे डि. डे. कलेक्टर श्रीयुत मुंडकूर महाशय सहजगत्या त्या गावी गेले म्हणून बरें झाले, नाहीतर त्या महारवाड्यात सहसा मनुष्य असा राहता ना! देवीसकीच्या आत्मघातक मूर्खपणाचा एक हृदयविदारक पण परिणामकारक दाखला म्हणून ते वृत्त खाली देत आहेत.

रत्नागिरी जिल्ह्यात दाभोळें हे गाव संगमेश्वर तालुक्यात आहे. या जिल्ह्यातील मोठमोठ्या महारवाड्यांपैकी एक महारवाडा ह्या दाभोळ्यास असून त्यात उर्णीपुरी ११० घरें नि ६०० माणसें गेल्या डिसेंबरात होती. त्या महारांपैकी काही महार परगावी कामावर खारेपाटणाकडे गेले होते. तिकडच्या पटकीच्या रोगात ते लागून दाभोळें येथे येऊन मेले. त्यांच्या संसर्गाने त्या महारवाड्यात पटकीची साथ आली. पहिले दोनतीन मृत्यू लागोपाठ होताच महार लोक घाबरले. त्यांच्या पुरातन समजुतीप्रमाणे 'देव' रागावला! पटकी (कॉलरा) हा एक रोग आहे, ती ठराविक रोगाणूंमुळे होते. त्या रोगाणूंना प्रतिकारक अशी लस टोचली की ती साथ हटते आणि भरपूर प्रकाश, स्वच्छता, शुद्ध जलवायू, वारापाणी हीं त्या साथीस फैलावू न देणारी प्रतिबंधके होत, ही साधी, सोपी उपपत्ती महारांना सांगितली तरी त्यांना अशा भयंकर साथीच्या राक्षसी थोरवीला न साजेशी मिळमिळीत कारणे सांगण्यापेक्षा पटकी ही महामारीची, मरिआईची एक रागीट देवता आहे, ती भयंकर रागावली असून, बकासुरासारखे तिला ठराविक बोकडांचे बळी दिले पाहिजेत, ती 'औषधाने बरी होणारी' नसून मंत्र, पूजा, नैवेद्य, नमस्कार, बलिदान यांनीच काय ती झाल्यास प्रसन्न होणारी आहे असे सांगणाराच खरा गुरु वाटणार. डॉक्टरचा तो प्रश्नच नव्हता. पटकीची ती साथ रोग असता तर डॉक्टरचा प्रश्न! ती साथ म्हणजे चवताळलेल्या वाघिणीसारखी जी रागावलेली देवता मरीआई तिने माणसांना दिलेला दंड, केलेली भयंकर शिक्षा होती! ती रद्द करवील तर ही आमची गुरवीण, ही संतीण, ही चेटकीण काय तर करवू शकेल. कारण मरीआईची लहर तीच काय ती संभाळू शकते. मरीआईच्या पुढे आमचें गाऱ्हाणे कसे मांडायचे ते तिलाच काय ते ठावें. मरीआईच्या पुढे जाण्याची वकिलीची सनद तिलाच काय ती मिळालेली! त्या वैद्याला नि डॉक्टरला तिथे कोण विचारतो? परंपरागत अशा या देवसकीच्या ठराविक भावनेप्रमाणे ते सारे महार त्यांच्या महारवाड्यात त्या वेळी जी एक संतीण होती तिला भयभीतपणे शरण गेले.

### २.६.२ देवसकीचें सारें चेटूक जाणणारी मरीआईची महारवाड्यातील संतीण !

तिने काचा कसून मंतरतंतर, छा छूचा मारा पटकीवर करण्यास तत्काळ आरंभिले. त्या महारवाड्यातील घरें आतून झाडून धुऊन, फिनेल शिंपडून, उजेड पाडून निरोगी करण्याचें कारणच नव्हते! पटकी घरात का असते? ती अवदसा कोणत्याही इतर माणसासारखी

अंगणातून ऊंबऱ्यावर नि ऊंबरा ओलांडूनच गेली तर आत जाणार! असा गूढ विचार करून 'संतिणीने' प्रत्येक महाराच्या घराबाहेरच्या अंगणातच पटकीस ठेवण्यासाठी पाहारेकरी ठेवले शेणाच्या तीनतीन पट्टयांच्या वर्तुळांचे!! असे मंतरविलेले तीन तीन शेणाचे पट्टे प्रत्येक घराभोवती काढून मग त्यावर खडूची लहान लहान वर्तुळें ओढलीं. उंबऱ्यापर्यंत पोचण्याच्या आधीच ती अवदसा पटकी गुदमरुन नाकात तिखट जाऊन कासावीस व्हावी एवढ्यासाठी त्या खडूच्या वर्तुळात मिरच्या पेटवून ठेवल्या. मीठमोहऱ्या घरावरून 'उतरुन' दृष्ट काढून त्या मिरच्यांच्या धुनीत सारखी टाकीत ती संतीण चेटुकाच्या मंत्रांचा मारा करीत राहिली. नंतर तिने महारवाड्याकडे मरीआईचें जे काही देणे घेणें होते त्याचा आढावा काढला. उसनें, उधार, गहाण, खरेदी, रोखीचे नि हस्यांचे एकंदर हिशोब ठिशोब त्या संतिणीने आपल्या डोक्याच्या पाटी पेन्सिलीवर करून वजावट होता ठरविले की, ह्या महारवाड्याकडे मरीआईचें सरासरी तीन रेडे येणें बाकी निघते. इतका उलगडा झाल्याबरोबर त्या महारवाड्यातील थोरा-मोठ्या माणसांसह मरीआईपुढे संतिणीने नारळ ठेवून नवस केला की, 'पटकी थांबव! आम्ही तुझे तीन रेडे लगोलग बळी देऊन, मारून, मागची थकलेली बाकी साफ फेडून टाकू!' त्या बाकीसाठी पटकीचा बेलिफ धाडून मरीआई जी त्या महारांचे प्राण जप्त करीत होती आणि मृत्यू त्या लिलावात त्यांना पटापट बोलण्यावारी विकत घेत चालला होता, तो भयंकर लिलाव आता थांबलाच पाहिजे असे त्या संतिणीने आश्वासिले आणि ते त्या महारांना पटले.

पण इकडे? इकडे घरोघर लोक पटापट पटकीने मरू लागले. आज सकाळी जो महार धटधाकट उठे तो संध्याकाळच्या आत मृत्यूचे आंचके देत पडे उद्या सकाळला जगातून नाहीसा होई. रेच, ओकाऱ्या दुर्गंधी यांनी त्या मूळच्याच गदळ नि आकुंचित असलेल्या झोपड्या घाण घाण होऊन गेल्या. पण कुटुंबे त्यातच! बोलता बोलता १९ माणसें मेलीं, आणि जर केवळ देवसकीच्या उपचारांचाच मारा ते महार करीत राहते, तर ती पटकी त्यांच्यांतला एकही मनुष्य जिवंत सोडती ना!

पण त्यांच्या सुदैवाने कलेक्टर श्रीयुत मुंडकूर महाशय हे नेहमीच्या फिरतीवर असता त्या गावी त्याच वेळी आले. पाहतात तों महारवाड्यात कॉलरा! पंधरावीस माणसें पटापट मरूनही गेलेलीं! त्या गावचा पोलिस पाटील एक अडाणी महारच होता. त्याला विचारले, तू ह्या मृत्यूंचे प्रतिवृत्त कां धाडले नाहीत? आणि ह्या संकटास तोंड देण्यासाठी ताबडतोब काय उपाय केलेस? त्याने सांगितले, 'संकटास तोंड देण्यास आमची संतीण आधीच सबळपणे झटत आहे, तिने घरोघर मंतरलेली शेणाची वर्तुळें अंगणातून काढून पटकीला ती ओलांडून घरात येण्याची बंदी केली आहे. देवीपुढे नारळ ठेवला आहे, तीन रेडे बळी देण्याचा नवस केला आहे, देवांना गाऱ्हाणींही घातलीं आहेत!' पटकीला हलविण्यासाठी केलेल्या त्या महार मंडळींचा हा कडेकोट बंदोबस्त पाहून त्या मुंडकूर महाशयांनी प्रथम त्या संतिणीला बोलाविले. आणि पटकी संपेतों त्या गावात पाऊल टाकण्याची तिलाच बंदी करून गावातून काढून दिले! या अपमानकारक आज्ञेमुळे चिडून ती दैवी शक्तीने अद्भुत चमत्कार करणारी चेटकी मुंडकूर महाशयांच्याच भोवती शेणाचे ते तीन पट्टे ओढून मंत्रबळे ठिकठिकाणी त्यांना आता डांबून टाकणार अशी कोणीही अटकळ करता; पण काय झाले काय की! थरथर कापत ती संतीण मुकाट्याने चालती झाली! त्या महारवाड्यातील आपत्तीपैकी ती संतीण जाताच आता उरली पटकी तेवढी!

ताबडतोब मामलेदारांना आणि देवरुखचे सरकारी डॉक्टर माहुली ह्यांना पटकीची लस घेऊन महारमंडळीस टोचण्यासाठी धाडण्यात आले. औषधेंही नेलीं, पण पाहतात तो महारमंडळी एकजात उलटून पडलेलीं! आम्ही टोंचून घेणार नाही! औषधांनी पोटं जाळायचीं आहेत आमची व्हय?' वाटेल तितके समजाविले महार टोचून घ्यायला म्हणून घराबाहेर पाऊल टाकीनात. शेवटी संध्याकाळी निरुपायाने मामलेदार नि डॉक्टर परतले. टोंचणे राहिले पण औषधें तरी घ्या, म्हणून येताना त्यांनी औषधाचे घोट देऊन ठेवले. पण त्यांची पाठ फिरताच महारांनी औषधें गुपचुप ओतून दिलीं! टोंचून घेणें नाहीं हाच निश्चय.

औषधांनी पोटं मात्र जळतील; पटकीची साथ थोडीच हटणार? औषधांनी बरा व्हायला तो रोग होता की काय? मरीआईचा राग तो! त्यांचें औषध देवसकी, त्यांचा डॉक्टर ती संतीण, ती गुरुवीण, ती चेटकी! मामलेदार झाला तरी माणूसच ना? ह्या माणसांच्या औषधांची, ह्या माणुसकीची ही गोष्टच नाही; ही देवसकी आहे देवसकी! असे भावीत महारांतील सगळ्या शहाण्यांनी त्या मामलेदारप्रभृती सर्व जणांना निव्वळ मूर्खात काढले. पटकी पुरवली पण हे प्रांताधिकारी नकोत असा जळफळाट महारवाड्यात चालू झाला. त्याच दिवशी त्या टीचभर महारवाड्यात तीस जण पटकीने लागले! पूर्वी लागलेले पटापट मरत होतेच. देवसकीच्या शेणाच्या तिन्ही पट्टया ओलांडून पटकी घरोघर घुसत होतीच!

मामलेदाराचें महार ऐकत नाहीत हे कळताच आपल्या हाताखालच्या मंडळीस घेऊन सकाळींच
(ता. ८-१-३६ला) प्रांत महाशय श्रीयुत मुंडकुर स्वतः महारवाड्यात गेले. मनधरणी करून जे वळले त्यांना तसे टोंचलें; नाही त्यांना घरात जाऊन धरून टोचले. जवळ जवळ शंभर माणसें टोंचली तों लसच संपली. म्हणून ताबडतोब मुंडकुर महाशय मोटारने रत्नागिरीस जाऊन तेथील सरकारी डॉक्टर श्री. देसाई आणि सरकारी रुग्णालयात होती नव्हती तेवढी लस नि पटकीचीं औषधें घेऊन दुपारी दाभोळ्याला परत आले. आणखी १३० महारांना टोचले. तों तीही लस संपली. तेव्हा चारपांच वाजता प्रांतमहाशय मोटारने कोल्हापुरला गेले. संस्थानी अधिकाऱ्यांच्या सहानुभूतीने तेथील मुख्य डॉक्टर रावबहादूर धनवडे यांचा लसीचा सारा साठा मिळवून ता. ९-१-३६ ला सकाळी प्रांतमहाशय श्री. मुंडकुर पुन्हा महारवाड्यात आले.

पाहतात तों पटाकीचा नुसता कहर उसळला होता! जिकडे तिकडे उलट्या रडारड, कण्हणे, धावंपळ! आईबाप दोघेही मेलेले पडले आहेत, भोवती लहान मुले रडारड करताहेत, जवळ कोणी नाही, शेजारी शेजाऱ्यांचें कोणी मरू घातले आहे! जिकडे तिकडे घाण, कचरा! त्यात ते महार प्रांताधिकाऱ्यांवर बिथरलेले. घरात येण्यास त्या सरकारी नि स्वयंसेवक डॉक्टरादिक मंडळीस ते आडकाठी करू लागले! पण मेलेल्यांची प्रेते घरातच पडलेलीं त्यांना खपत होती. काही घरांत दोन दोन तीन प्रेते खोलीत फेकून कुलुपें लावून बंद केलेलीं नि त्या खोपटांतल्या दुसऱ्या खोलीत सारी मुलेमाणसें निजत, बसत पडलेलीं होती! त्यामुळे साथ किती झपाट्याने महारांना पछाडीत चालली असेल ते सांगावयासच नको. अशा स्थितीत पहिली गोष्ट प्रेतें पुरण्याची. त्यांतल्या त्यांत जे धष्टपुष्ट महार होते त्यांना टोचून प्रेते पुरण्यास आज्ञापिले गेले. ते खड्डे किती खणणार! थकून त्यांनी दुपारीं हत्यारें फेकून दिलीं! तेव्हां स्वतः श्री. पाडतळकर मामलेदार आणि इतर मंडळी प्रेतांना उचलण्यास पुढे झाली. त्यांच्या या निस्सीम कळकळीचा

काही परिणाम होऊन महारांतील काही मंडळीही वळली आणि एका अटीवर काय ती प्रेते पुरू म्हणाली. ती अट म्हणजे ब्रँडी! तेही ठीकच समजून ब्रँडी प्रत्येकास थोडी पाजली. तेव्हा प्रेते पुरलीं गेलीं.

त्या विषारी नि घातक वातावरणात स्वयंसेवक नि सरकारी नोकर देखील घाबरुन गेल्यास काय नवल! ती मंडळीहि महारवाड्यातील त्या मृत्यूच्या जबड्यात राबावयास कचरु लागलीसें पाहून स्वतः मुंडकुरमहाशयांनी त्यांना हृदय हालवून सोडणाऱ्या शब्दांत समजविले की, 'आता जर आपण पाय मागे घेऊन तर ह्या महारवाड्याच्या दुर्दशेस पारावार उरणार नाही. भूतदया, धर्म, माणुसकी ती हीच की, ह्या अज्ञानी बापड्या महारांच्या जिवाचें तेच आपल्या! आईबाप सगेसोयरे गेलेलीं हीं केविलवाणी लेकरें, अनाथ तरुणी, वृद्ध माणसें पाहा! मी तरी ह्यांना मरणाच्या खड्ड्यात असे जिवंत पुरू देणार नाही. मी तरी ह्यांना सोडणार नाही. पटकीत मेलो तरी सोडणार नाही. त्या दयाशील अधिकाऱ्याच्या डोळ्यांतून टिपें गळलीं! ती व्यर्थहि गेलीं नाहीत. सर्वांनी तोच निश्चय केला. सर्वांनी प्रथम स्वतःला टोचून घेतले; आणि महारवाड्यात दिवसभर ते सारे थोरथोर अधिकारी आणि इतर स्वयंसेवक पुन्हा राबू लागले.

पण त्या दिवशी रात्रीं महारांनी निराळीच तोंड काढली! त्यांनी त्यांच्यातील अगदी मरणोन्मुख असे लोक बाहेर काढून दोनतीन गोठ्यांत टाकून दिले. नुसतेच लागलेले जे बऱ्या स्थितीत होते त्यांना बरोबर घेतले, भांडीकुंडी जे घेववले ते सामान बोचक्यांतून भरुन डोक्यावर चढविले आणि रातोरात ते महार महारवाडा सोडून रानावनांत पळून गेले! उरलेलीं अनाथ मुलेमाणसें त्या भयाण महारवाड्यांत त्या घाण झालेल्या घरांत, गोठ्यांत हगवणी नि ओकारीने लडबडलेल्या कण्हत्या, मरत्या रोग्यांतच मिसळलेलीं होती!

ता. ११ ला सकाळी प्रांतमहाशयादिक मंडळी येऊन पाहतात तों महार पळून गेलेले! हे आयतेच झालेले स्थानांतर एका अर्थी उपयुक्त तर दुसऱ्या अर्थी भयंकर! कारण गावोगावी ती साथ हे पळते महार पसरविणार. यासाठी ताबडतोब आजूबाजूच्या गावांना सक्त आज्ञा देण्यांत आली की दाभोळचें मनुष्य येऊं देऊ नये. तेथील रानावनांत आजूबाजूलाच महारांना रोखून ठेवण्यात आले. त्या वेळी श्री. शेंड्ये हे आपले सहकारी शेट्ये नि श्री. तेंडुलकर या हरिजन संघाच्या स्वयंसेवकांची टोळी घेऊन साहाय्यास आले. तेथील दोन मिशनरी शाळाशिक्षक सातवळेकर बंधू हे प्रथमपासूनच जिवापाड मेहनत करीत होते. या सर्वांनी मिळून महारांच्या घरांना साफ करण्यास आरंभ केला. कौलारें उपसून आंत अवश्य तो उजेड आणला. आपल्या हाताने घरें, वाटा झाडून साफ केल्या. सारवून काढले. अनाथ मुलांमुलींना रोग्यांपासून निराळें ठेवले. प्रेते सारी पुरलीं. पळून गेलेल्या महारांच्या मागे जाऊन ते जेथे फुटून फुटून झाडाझुडुपांखाली राहात होते तेथे औषधें पुरविली. महार औषधें फेकीत म्हणून दिवसातून तीनदा ही सारी मंडळी त्या दूरदूरच्या महार टोळ्यांत फेऱ्या घालून औषधें समक्ष पाजू लागलीं. उरलेल्यांना टोचले. अशा अनेक उपायाउपचारांनी ता. १५च्या संधीस पटकीची साथ एकदाची आटोक्यात आली! लागलेले उणेपुरे शंभर महार वाचले. अनाथ मुले दहापंधरा, त्यांत एक लेकरू अवघें सहा महिन्याचें. त्याचें काय करावयाचें हा प्रश्न होताच. मिशनरी त्यांना पाळावयास नेते. पण ते धर्मान्तराच्या अटीवरच असणार! तो काही त्यांचा दोष नव्हता; कारण

बोलून चालून ते मिशनच. असा प्रसंग पाहून रत्नागिरी हिंदू सभेने ती सारी अनाथ महार मुले रत्नागिरीस अवश्यच तर धाडून द्यावी, आपण पाळू म्हणून कळविले.

इतक्यात रत्नागिरीच्या नि देवरुखच्या नागरिकांनीही त्या संकटात, त्या अन्नान्नदशा झालेल्या महार कुटुंबासाठी एकंदर ५२ पोती धान्य, नि कपडे पण धर्मार्थ जमवून श्रीयुत मुंडकूरमहाशयांकडे धारले. ते त्यांनी यथोचितपणे वाटून दिले. अनाथ लेकरांना सर्वांनी किती ममतेने जोपासिले.

त्या सहाशे महारांनी देवसकीच्या पायी आपल्यावर मृत्यू ओढवून घेतला होता! जर वेळीच त्यांना श्रीयुत मुंडकुरमहाशयांसारखा कनवाळू सज्जनांच्या 'माणुसकीने' हात दिला नसता तर ते बहुतेक पटकीला बळी पडल्यावाचून राहिले नसते. इतकी धावाधाव केली तरी पन्नास महार त्या एवढ्याशा महारवाड्यात आठ दिवसांच्या आत पटकीने मेले. जवळजवळ १०० महार पटकीने पछाडून मरणाच्या तोंडात पडता पडता बळें बळें ओढून काढून वाचविले गेले. वेळीच धरून धरून टोचल्यामुळे बाकीचे बिनडाग बचावले. खरोखर श्री. मुंडकुरमहाशय नि त्यांचे सहकारी यांनी पांचशे महारांचे जीव, आपले जीव धोक्यात घालून वाचविले. जिल्ह्याचें कलेक्टर श्री. जोशीमहाशय यांनी त्यांच्या या हाताखालच्या सर्व अधिकाऱ्यांना शक्य ते पाठबळ नि प्रोत्साहनच दिले. ह्या प्रकरणी तरी ह्या सर्व अधिकाऱ्यांनी सरकारी नोकर हे खरोखरीच जनिक सेवक असावेत हे तत्त्व नि पदवी सार्थ केली हे त्यांना भूषणावह आहे! जे स्वयंसेवक केवळ कर्तव्य म्हणून आपण होऊन त्या संकटात जिवापाड श्रम घेते झाले त्यांचें महत्त्व स्पृहणीय आहेच आहे.

रोग हा देवाचा राग नाही, लहर नाही म्हणूनच देवसकीचा तो विषय नव्हे. प्रार्थनेने, पूजेने, बलिदानाने देव पावून रोग बरा करीत नाही. त्याच्या प्रतिकाराचें साधन धर्मशास्त्र नव्हे. रोग हा सृष्टीक्रमाच्या अबाधित नियमांचा परिणाम. आरोग्य, विद्या नि वैद्यकशास्त्र हेच त्याच्या प्रतिकाराचें साधन. त्यांतील सृष्टीविज्ञानाप्रमाणे मानवी उपचार केले की रोग हटतो. टोचले की 'पाप्याला' ही सहसा प्लेग, देवी, पटकी होत नाही. न टोचले तर वेदज्ञ विप्रही हजारों हजार त्या त्या रोगात तडफडून मेल्यावाचून सहसा राहत नाहीत. हे साधें सत्य कोणत्याही कल्पित गोष्टीपेक्षा ह्या महारवाड्यात झालेल्या देवसकी नि माणुसकीमधील झटापटीत किती परिणामकारकपणे प्रत्ययास येते ते पाहा! ते दोन्ही पंथ जणू काय प्रयोगशाळेंतच हेतूतः तसे कसोटीस लागले. भाबडी देवसकी बहुधा मृत्यूकडे नेते, विज्ञानप्रवण माणुसकी मृत्युस बहुधा जिंकते.

### २.६.३ पटकीवरचाच नव्हे तर अस्पृश्यतेवरचाही तो एक विजय होता !

आणखी एका दृष्टीने ही घटना सामाजिक महत्वाची आहे. 'अस्पृश्यां'च्या छळाविषयी आम्ही कठोरातील कठोर टीका करून आजपर्यंत त्यांना प्रतिकारीत आलो. तेव्हा आम्ही तिकडे कानाडोळा करू हे शक्यच नाही. परंतु आंबेडकरांसारखी काही मंडळी जी स्पृश्यांविषयी सरसकट चिडखोरपणा करू लागली आहेत त्यांचा प्रतिवाद करणें हीही कृतघ्नताच होणारी आहे. स्पृश्यात अस्पृश्यतानिवारणार्थ जिवापाड झटणारा वर्ग कसा वाढत आहे, आपल्या 'सनातनी' कुटुंबीय आप्तांचादेखील असंतोष पत्करून त्यांच्या प्रेमावर पाणी सोडून अस्पृश्यतानिवारणार्थ तो

वाढता वर्ग कसा प्रामाणिकपणे झटत आहे, तेही ह्या दाभोळें येथील महारवाड्यांतील पटकीच्या संकटातील वर दिलेल्या वस्तुस्थितीवरून स्पष्ट होत नाही काय? स्पृश्य अस्पृश्यांचा कसा छळ करतात हे जसें दाखविले पाहिजे, तसेच अस्पृश्यतानिवारणार्थ निरपेक्षपणे झटणारा स्पृश्य वर्गही झपाट्याने वाढत आहे हेही लपविता कामा नये. दाभोळें येथे त्या महारवाड्यात स्वतःचा जीव धोक्यात घालणाऱ्या या वरील लहान थोर मंडळीत भूतदयेची जशी जाणीव होती, तितकीच अस्पृश्यतेस मूठमाती देऊन अस्पृश्यतेची किंचितही किळस न मानता झटणें, अस्पृश्यांची विशेष सेवा करणें, हे कर्तव्यही आपण करीत आहो, याचीही स्पष्ट जाणीव होतीच होती. नाहीतर इतर काही स्पृश्य लोक त्या महारांना जसे त्या संकटातही शिवेनात तसे हेही शिवते ना! पण त्या अधिकारी नि बिनअधिकारी जनसेवकात असलेले ब्राह्मण, प्रभू, मराठे, वैश्य प्रभृती अनेक स्पृश्यजातीय सज्जनांनी आपल्या भावाबहिणींची करावी तशी सेवा त्या महारबंधूंची केली, त्यांच्या रेच, उलट्या घाण साफ करून स्वहस्ते त्यांची घरें सारविलीं, प्रेते पुरली, औषधें देऊन, सेवा करून त्यांना मृत्युमुखांतून सोडविण्यासाठी आपण मृत्युमुखात हात घातला! अशा उदाहरणाचें कृतज्ञ कौतुक हे अस्पृश्योद्धाराच्या कार्यास अत्यंत उत्तजेक झाल्यावाचून राहणार नाही. अस्पृश्यांतही महार भंग्यांसाठी वा ढोरासाठी जी सहानुभूति दाखवीत नाही ती जे स्पृश्य दाखवितात त्यांचे आभार मानण्यात अस्पृश्यांचेही हित आहे.

(मार्च १९३६, किर्लोस्कर)

* * *

## २.७ अपघात की आत्मघात

‘कर, नमस्कार कर अं बाळा वडाला! अस्सा! देवबाप्पा आहे बरं का वड!’ भीमाबाई पाटलिणीने आपल्या दोन-अडीच वर्षाच्या लहानग्यास भक्तिभावाने वडाच्या मुळावर डोके ठेवावयास सांगितले. त्या वडास भीमाबाई गेलीं आठ वर्षे, लग्न होऊन ह्या तिच्या सासरी आल्यापासून, नित्य नेमाने शंभर तरी प्रदक्षिणा घातल्यावाचून जेवत नसे. ती जरी त्या गावाच्या मराठी पाटलांच्या जुन्या घराण्यात दिली होती, तरी सध्या त्यांच्याकडे नावापलीकडे पाटिलकी अशी नव्हती. उलट अगदी निर्धन होते ते कुटुंब. त्यातही दीड वर्षांपूर्वी तिचा नवरा प्लेगात वारला, तेव्हा तिचें हे एकुलते एक मूल घेऊन ती त्या वडाशेजारी विखुरलेल्या दहापांच झोपड्यांपैकी एका झापाच्या झोपडीत राही. दिवसरात्री वेळ सापडेल तशा विड्या वळी, नि एका मराठा पानतंबाखुवाल्या दुकानदारास त्या घरबसल्या विकून त्या तुटपुंज्या उत्पन्नावर आपले पोट भरी. ती आता मध्यम वयाची होती. त्या एका लहान मुलावाचून तिला मागेपुढे कोणीही नव्हते. तो वड तिचा देव नि ते मूल तिचा जीव.

वडाच्या प्रदक्षिणा संपवून त्या मुलास वडाच्या पायावर घालून, नैवेद्याचें थेंबभर दूध त्या मुलास तिने प्यावयास दिले. दुधाचा असा त्या मुलास तेवढाच उकाडा! पण ते थेंबभर दूध वडाच्या - देवाच्या नैवेद्यांचें! तिला वाटे, ते प्याल्यावर इतर मणभर दुधादह्याने जी पुष्टी तिच्या बाळास येणार नाही ती त्या वडोबाच्या प्रसादाने आल्यावाचून राहणार नाही. ते मूल मुळी जन्मले तेच वडोबाच्या प्रसादाने! कारण लग्न होताच शेजारच्या चार आयाबायांच्या सांगण्यावरून वडास प्रदक्षिणा घालण्याचें जे व्रत तिने घेतले ते मुलगा व्हावा म्हणूनच होते. तशा नवसावाचूनही तिच्या बरोबरीच्या बायांना एक सोडून तीनतीन मुलगे झाले होते. पण पांच वर्षे प्रदक्षिणा घातल्यावर झालेलें हे एक मूल त्या वडाच्याच सेवेने नि प्रसादाने झाले असे तिला तेवढें वाटे. वडपिंपळाला वस्तूत:च देवता मानणाऱ्या त्या भाविक हिंदू वस्तीत तिच्या या श्रद्धेचे सर्वत्र कौतुक होई. देवताची प्रतिष्ठा नि पूजा विशेषच भक्तिभावाने दूरवर फैलावण्यास कारण होई.

समोरच्या माळावर असाच एक जुनाट, सुकट, पोखरलेला वड होता. तो माळ मिशनरी साहेबाने विकत घेऊन तिथे दुसरीकडून दुष्काळाबिष्काळातून बाटवून वा पळवून आणलेलीं मुले पाळण्यासाठी एक मिशनची चाळ नि बंगला बांधला; तेव्हा तो निकटचा वड नि दोनतीन तसलेच रोगट पिंपळ बंगल्याच्या नि चाळीच्या रचनेस आड येतातसे पाहून मुळासुद्धा उखडून टाकले. नंतर त्या माळालगत जो नवा पथ बांधला त्याच्या दोन्ही रागांस नवे वड नि पिंपळ असे छान रेखून लावले की, त्याच्या सलग कमानीखाली तो पथ म्हणजे एखाद्या सुदीर्घ कुंजासारखा भर उन्हाळ्यातदेखील शीतल वाटावा. त्या वडपिंपळांच्या तिरप्याशिरप्या फांद्या प्रतिवर्षी काटून छाटून त्यांना माणसाळविलेल्या हत्तीच्या सोंडेत धरविलेल्या चवरीसारखे मनुष्याच्या सोयीसोयीनेच डोलत झुलत राहावयास भाग पाडले होते. वडपिंपळ मुळासकट उपटणाऱ्या, प्रत्यही त्यांच्या फांद्या कापणाऱ्या, एकही प्रदक्षिणा न घालणाऱ्या त्या मिशनला कोणत्याही वड-पिंपळाने ‘मुले न होण्याचा’ शाप कसा दिला नाही? उलट त्या मिशनमधली मुले अधिक गुटगुटीत नि वाढत्या संख्येचीं कशीं? इतकेच नव्हे तर एकदोन प्रसंगी अलीकडेच

त्यांच्या बंगल्यातील दोघी बाळंतिणींस सुरेख असे जुळे मुलगे उपजून ते दुडूदुडू त्या माणसाळलेल्या वडपिंपळाच्या छायेत खेळत असता त्यांना त्या तोडलेल्या वडपिंपळावरील रागीट मुंजोबाने एकही बोचकारासुद्धा आजपर्यंत कसा घेतला नाही? असे भीमाबाईस त्या भागाच्या वतीने त्या गांवच्या नगरसंस्थेत सभासद म्हणून निवडून गेलेले डॉ. मोहिते हे पुष्कळ वेळा विचारीत आणि समजावून सांगत की, ज्या अर्थी तो वड अगदी पोखरलेला. रोगीट, छायाशून्य नि पडावयास आलेला आहे त्या अर्थी त्याच्या आसपासच्या झोपड्यांवरचें ते एक संकट टाळण्यासाठी तो पाडून उखडून टाकणेंच इष्ट.

डॉ. मोहिते हे भीमाबाईचे दूरचे नातलग. त्यांना म्युनिसिपालिटीत निवडून देताना त्या बिचारीला स्वत:चे मत नव्हते, तरी दोनतीन नातलगांची मते तिच्या यत्नानेच मिळाली होती. पण पुढे नगरसंस्थेत गेल्यावर डॉक्टर मोहित्यांनी आपल्या भागातील वाटा, आळ्या, अंगणें, चौक स्वच्छ, बिनधोक नि रेखीव करून तिकडचें आरोग्य वाढवावें असे मनात आणून काम चालू केले. खळगेखांचा भरून वाटा सुधारल्या, बोळातील उकिरडे, घरांच्या रांगामध्येच सांचलेलीं डबकी, माजलेलीं झुडपें, सडलेले गडगे साफसूफ नि नीटनीटके केले आणि आता मुख्य सडकेच्याच कोपऱ्यावर तिरप्या पुढे आलेल्या एका दगडी ढिगाऱ्यातून ज्याचा जुनाट, पोखरलेला नि सुकट सोट वर गेला आहे, एक आडवी फांदी अस्ताव्यस्त लाठीप्रमाणे आलेली अहे, नवीन पालवीचे उगीच काही झुबके वर्षाकाठी फुटत तेव्हा काय ते ते झाड आहे, पुरलेला नि बांधलेला वासा नव्हे असे वाटे; इतका जो निर्जीव, नि:सत्व नि छायारहित झालेला आहे, असा तो वड पाहून तो तिरपा ढिगारा काढून सडकेवरील ती आडकांठी नि त्या ढिगाऱ्याच्या भोवती वेड्यावाकड्या बांधलेल्या झोपड्यांतील माणसांवरचें ते संकट दूर करावें, असा डॉ. मोहित्यांनी बेत केला. पण ती गोष्ट लोकांस कळताच त्या वसाहतीत एकच गवगवा नि आरोळा उठला. ‘आमचा वड! आमचा वडोबा देव! पाडू देणार नाही! आमच्या धर्मभावना दुखविता कामा नये!’

भीमाबाई पाटलिणीला तर तो तिचा पूजेचा वड पाडू पाहणाऱ्या डॉक्टर मोहित्यांचा मनस्वी राग आला होता. ज्या वेळी नगरसंस्थेत तो ठराव येणार होता, त्याच्या आधीच त्या वस्तीच्या लोकांनी वड पाडून आमच्या धर्मभावना दुखवू नयेत, असा निषेधाचा एक अर्ज करण्याचें ठरविले होते; आणि त्यावर सह्या घेण्याचे काम जोराने चालले होतें. त्याविरुद्ध वड तोडावा असे म्हणणाऱ्यांचा अर्जही अर्थात् व्हायचा; पण त्यावर सह्या मिळणें फार कठीण जाऊ लागल्यामुळे त्या दिवशी डॉ. मोहिते हे स्वत: घरोघर हिंडून लोकांची समज घालीत होते. त्याच भागात मोडणाऱ्या त्या मिशनच्या चालक मिस् ल्यूसी ह्या अमेरिकन बाई तो वड तोडावा ह्याच मताच्या; त्याही नगरसंस्थेच्या मिशनरी सभासद; ह्यासाठी वड तोडण्यास अनुकूल मते मिळविण्याचें काम काढून घरोघर हिंडत होत्या परंतु वडाच्या प्रकरणापेक्षा हिंदू धर्म किती ‘सुपरस्टिशस’- धर्मभोळा आणि ख्रिश्चन धर्म हाच कसा धर्मभोळेपणापासून सर्वस्वी अलिप्त, हे पुराण पाल्हाळाने सांगत बसण्यामध्येच मिस् ल्यूसीबाई त्या संधीचा उपयोग अधिक प्रामुख्याने करीत होत्या.

भीमाबाई आपल्या मुलास वडाच्या पायथ्यावर डोके ठेवण्यास सांगून, पूजा आटोपून त्या ढिगाऱ्याच्या खाली मुलास उतरवून जो आपल्या खोपटाशी येऊन पाहते तो मिस् ल्यूसी

हसतमुखाने तिथे उभ्या असलेल्या तिला दिसल्या. वड तोडावा अशा मताची सही भीमाबाईने द्यावी असे त्या म्हणाल्या तेव्हा 'मी काय ते उद्या सांगेन' असे म्हणून भिमाबईने वेळ मारून नेली. मिस् ल्यूसी त्या झोपड्यांतील मंडळीत नेहमी मिसळे, खाऊ वाटी, बायबलचीं गाणीं गाई, 'वडाच्या पूजेचें फळ म्हणजे हे माझें बाळ' असे भीमाबाईने बोलण्याच्या ओघात गहिवरून सांगितलें, तेव्हा मिस् ल्यूसीने त्या विषयाचा ओघ आपल्या आवडत्या प्रकरणी मिळवून म्हटले 'वेडें खरें! पण आईचें प्रेम हो टुमचें हे! या प्रेमाने देवादिकांनासुद्धा गहिवर येतो बरें! आमच्या देवी मेरीचेंच पाहा ना! गाणेंच म्हणते अं हे ! असा उपक्रम करून मेरीला येशूची मूर्ती पाहून प्रेमाचा पान्हा कसा फुटला त्याचे बायबलातील कथेवरचें एक मराठी गाणें म्हणण्यास तिने आरंभ केला. बाई गोरी, गाणें मराठी, गळा गोड, नको म्हटले तरी भीमाबाईला ते ऐकावसें वाटले. दहा पांच इतर बायामुलेही जमलीं. ते गाणें चालले आहे तोंच डॉ. मोहितेही सह्यांचा एक कागद घेऊन तिथे आले. त्यांस पाहताच मिस् ल्यूसी उठल्या नि विषय झटकन् बदलून म्हणाल्या, 'हॅलो डॉक्टर! बघा! ए बाई समझटे है की वडाचे प्रसाडाने टिला मुलगा झाला! विश्वास टरी कसा बसटो अशा भाकड समजुटीवर? टुमच्यासारखे रॅशनॅलिस्ट लोक यांना सुधारीट कां नाहीट?'

डॉ. मोहिते थोडे हसून म्हणाले, 'मिसीसाहेब, माझ्यासारख्या खऱ्या रॅशनॅलिस्टसंबंधी विचाराल तर मला तुम्ही दोघीही सारख्याच धर्मभोळ्या वाटता! अहो, तुम्ही आत्ताच श्रद्धापूर्वक जे गाणें म्हणत होतात तेच आठवा! वडाच्या प्रसादाने मुलगा झाल ही ह्या भीमाबाईची श्रद्धा बुद्धिवादाने टाकाऊ ठरते हे तुमचें म्हणणे जितके खरें आहे, तितकेच कुमारी मेरीच्या पोटी देवाच्या तेजाने येशूख्रिस्त जन्मले ही तुमची श्रद्धासुद्धा टाकाऊ ठरते हेही खरें नाही काय?'

'पण ही आमची ढर्मभावना है!'

'आणि वडही ईश्वराचं प्रतीक, त्याच्या प्रसादाने मूल होते ही भीमाबाईची धर्मभावनाच आहे. ती तिची भावना खुळी आहे असे बुद्धीवादाच्या, 'रॅशनॅलिझम'च्या प्रचारार्थ जर तुम्ही सांगता आणि ते चांगलेच करता, तर त्या बुद्धिवादाच्याच कसोटीस तुमच्या धर्मभावना लावण्याचा अधिकार मलाही असला पाहिजे. अहो, पृथ्वी वाटोळी आहे हे सांगणाऱ्यालाही धर्मभावना दुखवितो म्हणून ख्रिश्चनांनी ठार केले. पृथ्वी फिरते हे सांगण्याविषयीही दंड झाला! फार काय अमेरिका खंड शोधणाऱ्या कोलंबसासही बायबलमध्ये न सांगितलेले देश आहेत असे म्हणून आमच्या धर्मभावना हा दुखवितो, या आरोपाखाली ख्रिस्ती धर्मगुरूंनी अपराधी ठरविले नव्हते काय? धर्मभोळेपणाचा मक्ता हिंदू लोकांनाच तेवढा दिलेला आहे ही तुमची समजूत नि शेखी हाही एक धर्मभोळेपणाच आहे. खरा बुद्धीवादी ज्या ज्या समजुती असत्य वा लोकहितास प्रत्यक्ष अपायकारक आहेत त्या त्या सुधारू झटतो, मग त्या ख्रिस्ती असोत, मुसलमानी असोत! आणि अशा खुळ्या समजुती सर्व धर्मातील लोकांत धर्माचें कातडें पांघरुन बोकाळलेल्या आहेत. हिंदूतील धर्मभोळ्या समजुती काढून त्यांच्या गळ्यांत मुस्लिम वा ख्रिस्ती धर्मवेडेपणाचा धोंडा बांधणे हा काही बुद्धिवादाच्या प्रचाराचा प्रामाणिक मार्ग नव्हे!'

इतक्यात समोरच्या चर्चमध्ये अकरा वाजल्याचे ठोके पडले. मिस ल्यूसीसमोर भीमाबाई मनमोकळें बोलणार नाहीत असे वाटून नि घरी जाण्याची वेळ होऊन गेली म्हणून डॉ. मोहिते भीमाबाईस 'आता मला गेलंच पाहिजे, संध्याकाळी येईन हं!' असे सांगून ल्यूसीबाईसह बोलत

बोलत परत गेले. भिमाबाईंनाही हायसें वाटले. कारण त्या डॉ. मोहित्यांच्या भिडेस बळी पडण्याचें टाळीत होत्या. 'वड पाडू नये' या अर्जावर सही मागणारे लोक आधी भेटावे अशी त्यांची इच्छा होती.

'वडदेवा, तुला पाडून टाकणारांचेच दांत पडोत!' असा भीमाबाईने आज पूजा संपताना त्या वडालाच नवसही केला होता.

इतक्यात पंचवीसतीस लोकांचा घोळका घेऊन भिंगार्डे वकील या वस्तीत वादळासारखे आले. 'सह्या करा! खोड मोडा ह्या वडपाड्यांची; तुम्ही कोणत्या पक्षाचे! वडपाडे की वडराखे? सनातनी की सुधारक? असा ते लोक एकच गलका करीत सह्यांवर सह्या घेत चालले. सही नसली तर अंगठ्याचे ठसे. त्या वस्तीत बहुतेक वस्ती वडराखी पक्षाचीच होती. भिमाबाईंनीही आपण होऊन सही दिली नि वडाचें ते दैवत किती जागृत आहे हे आपल्या स्वत:च्या अनुभवे सर्वांना कळकळीने सांगितले. कडेवरच्या मुलाची हनुवीटी वर उचलून भीमाबाई आसवें गाळीत म्हणाली, 'माझ्या प्रदक्षिणांच्या व्रतास वडोबा पावला नि हे बाळ मला दिले! माझ्या वंशाच्या वेलीला फूल आले! पुढे लगेच ह्या तान्हुल्याचे वडील प्लेगात इथेच ज्या दिवशी वारले त्या दिवशी मी या लेकराला ह्या वडाच्याच पायावर घातले नि म्हटले, 'देवा वडा, आता तूच माझ्या लेकराला सांभाळ! तुझ्या सावलीत तुझ्या पायावर हे माझें मूल लहानाचें मोठें होऊन कापसासारखे पांढरे शुभ्र केस होईतो नांदू दे. चिरंजीव होऊ दे!' दहापांच वेळा दहापाच येत्याजात्यांना तिने तेच ते सांगितले नि प्रत्येक वेळी कथेचा पूर्णविराम झाला की एक असे त्या लेकराचे दहापांच मुके घेतले.

वडाराखे पक्षाचा तो घोळका परत चालला. सगळ्यांच्या पुढे श्री. भिंगार्डे वकील तावातावाने प्रतिज्ञा करीत होते की, 'ह्या वडपाड्यांचे दात पाडीन तरच मी भिंगार्डे! ह्या सगळ्या पाखंडाचा मूळकंद म्हणजे हा धर्मबुडाऊ डॉ. मोहिते. पण त्याचा तरी दोष काय? अशा अस्तनीतल्या निखाऱ्यांना म्युनिसिपालिटीच्या अस्तनीत ठेवणारे तुम्ही मतदारच दोषी आहात. आता द्याल का पुन्हा त्याला निवडून?'

सारे लोक एकमुखी कर्ण्यासारखे ओरडले, 'उभा तर राहू द्या, आता त्या डॉक्टर मोहित्याला पुन्हा! आता भिंगार्डे वकिलांनाच निवडून देणार! वकील महाशय, तुम्ही राहिलेच पाहिजे आं उभे. एक वेळ हा वड पाडू देऊ पण भिंगार्डे वकिलांना निवडणुकीत पुन्हा पडू देणार नाही!'

लोकांची ही प्रतिज्ञा ऐकताच भिंगार्डे वकील 'आता वड पडला तरी चिंता नाही.' असे सपकन बोलून जाणार होते; पण वेळीच त्यांनी ते शब्द गिळले. भिंगार्डे वाणीजातीचे. पूर्वी एकदा कथेच्या वेळी देवळात त्यांना ब्राह्मणानी बुक्का लावण्याचें नाकारले; तेव्हा ते सुधारक म्हणवून ब्राह्मणांस यथेच्छ शिव्या हासडीत. त्याचें प्रायश्चित गेल्या निवडणुकीत त्यांना मिळून ते पडले नि डॉ. मोहित निवडून आले. ही वड न पाडण्याची चळवळ त्यांनी कां हाती घेतली हे आता न सांगताही समजण्यासारखें आहे. सनातनी ब्राह्मण बहुसंख्य मंडळींचीं मते आता त्यांना नक्की मिळणारीं होती. धर्मबुडव्या डॉ. मोहित्यांना आता लवकरच होणाऱ्या निवडणुकीत चारी मुंड्या चीत पाडण्याचा त्यांचा डाव, हा वडाचा हुकमी एक्का त्यांच्या हातात आल्यामुळे

जिंकल्यासारखाच होता. वकिलीत नि निवडणुकीत पक्षकार नि मतदार मिळवून देणारा जो सोप्यातला सोपा उपाय तो सनातन धर्म, ही त्यांची व्याख्या होती.

नगरसंस्थेच्या सभेत, वड पाडून, तो कोलमडावायास आलेला पानांचा ढिगारा काढून, सडक सरळ करावी म्हणून ठराव येण्याच्या दिवशीच वड पाडू नये ह्या अर्थाचा शेकडो नागरिकांच्या सह्यांचा तो अर्जही दाखल झाला! वडराखे नि वडपाडे ह्या दोन पक्षांतील चुरस अगदी विकोपास गेली. सडकेवरून जाणाऱ्या नागरिकांच्या जिवावर, त्या कोलमडलेल्या उंच ढिगाऱ्याचें त्या पोकळ पतनोन्मुख फांद्यांचें नि त्या सोटाचेंही संकट तरवारीसारखे लकटते आहे हे बहुतेक सभासदांना मान्य होते. पण विरोध चिघळलेला! शेवटी अध्यक्षांनी सामोपचराने त्या बाजूच्या वस्तीची समज पाडण्याचा यत्न करण्यासाठी तिकडच्या पंचवीस पुढाऱ्यांची सभा भरवून तडजोड करवावी असा सभासदांस अभिप्राय दिला. स्वतः अध्यक्षसुद्धा समज पाडण्यासाठी नेमलेल्या मंडळात होतेच. ही तडजोड घडतों त्या सडकेच्या फाट्यास 'वाट बंद' म्हणून दोन्ही तोंडांवर पाट्या लावाव्या आणि गाड्याप्रभृती वाहनांना तरी बंदी असावी, अशी तात्पुरती व्यवस्था झाली! माणसांना वाट बंद केली - पण तो सुकट वड नि पडाऊन पार पाडला नाही! झाडाच्या सोयीसाठी माणसांची गैरसोय! ! झाड देव, मनुष्य झाडपाला!

समजूत पाडण्यासाठी बोलावलेली सभा भरली. त्या वस्तीचे पंचवीसतीस पुढारी आणि अध्यक्षांसुद्धा बरेच नगरसंस्थासभासद उपस्थित होते. वडराखे पक्षाचे शेकडो लोक सभागृहाबाहेर लोकमताचा दाब पाडण्यासाठी भिंगार्डे वकिलांनी जमवून ठेविलेले होते. स्वतः भिंगार्डे, हरभटशास्त्रीप्रभृती मंडळी पुढारी म्हणून सभेत होती. नगर-संस्था-सभासद म्हणून मिस ल्यूसी नि पीरजादे हेही आले होते.

वड कां पाडू नये याची कारणें, सांगण्यास प्रथम हरभटशास्त्री उठले, 'वड ही देवता आहे. त्यास पूजावें, प्रदक्षिणावें आणि कधीही तोडू नये असे शास्त्र आहे. 'जे हिंदू लोक वडाला तोंडतील ते' 'पतन्ति नरके घोरे' असा शास्त्राचा स्पष्ट दंडक आहे! माझ्या आजोबांना एक भूमि दान मिळाली, घर लहानसें तीवर बांधले, पण वडाचें झाड मध्ये असे होते की त्याला टाळून घर सलग बांधणे कठीण. अशा अडचणीतही ते झाड न तोंडता घर तिरपें-शिरपें बांधले; पण वड तोंडला नाही. उलट त्याच्याभोवती लहानसा चौक सोडून, कौलारातून त्याला धुराड्यासारखा मार्ग वर मोकळा सोडला. त्याचीं पाने, कचरा सारा कौलारावर घराच्या आत बाहेरही पडे; त्याला लागून असणाऱ्या भिंतीखाली, त्याचीं मुळें घुसून एक भिंत ढासळली ती पुन्हा बांधली, पण त्या धर्मपरायण ब्राह्मणाने वड पाडला नाही. आजही त्याच घरात आम्ही राहतो, आणि वडाची पूजा, नैवेद्य झाल्यावाचून जेवत नाही. आम्हां हिंदूंची धर्मभावना हे घडू देणार नाही!'

'वड तोंडणे म्हणजे हिंदू धर्म उच्छेदणें, आणि वड पूजणें म्हणजे हिंदू असणें, अशी हिंदुधर्माची उथळ नि भिकार व्याख्या कोणतयही ग्रंथात मला आढळत नाही.' डॉ. मोहिते शांतपणे बोलू लागले, तोंच भिंगार्डे वकील मध्येच उठून चवताळले,

'तशी व्याख्या तुम्हांला आढळत नसली तरी मला आढळते. अहो वडाची पूजा जी आमच्या धर्मात सांगितली, ती काही धर्मभोळ्या अशा कोण्या वेडगळाने नव्हे, अगदी तुम्ही ज्या विज्ञानाच्या (Scienceच्या) नावाची शपथ येता जाता घेता, त्या विज्ञानाच्या आधारे वडाची

थोरवी किती आहे ते बघा! त्याच्या पारंब्या औषधी, त्याची छाया, त्याचीं पानें, दूध, त्याचा अणु नि रेणु एखाद्या हुतात्म्यासारखा, मनुष्याच्या हिताला वाहिलेला आहे. तो पडला तरी मरणानंतरही त्या वडाचा देह म्हणजे त्याचीं लाकडें, फांद्या, पाचोळा आपल्या झोपड्यांच्या वाशास आणि चुलीच्या जळणास उपयोगी असतात. अर्थातहुतात्म्याहून परोपकारात वड श्रेष्ठ आहे. कारण मेल्यानंतर हुतात्म्यांच्या हाडांचे वासे आमच्या झोपड्यांस उपयोगी पडत नाहीत, त्यांचा कोणचाही भाग चुलीचें सर्पण म्हणून जाळता येत नाही. अहो मूर्खहो, यास्तव आमच्या त्रिकालदर्शी ऋषिवर्यांनी वडास देव मानले, वड ईश्वराचें प्रतीक आहे! ईश्वराची विभूति आहे! वडच ईश्वर आहे!!! जो वडा-पिंपळाला तोंडील तो हाडाचा हिंदू नव्हे! तो मुसलमानच होय!'

भिंगार्डे वकील भर रंगात येऊन, आणखी बोलणार होते, पण मूळ वक्ते डॉ. मोहिते असता आपण मध्येच बोलत आहा. असे अध्यक्षांनी घंटी वाजवून वाजवून दरडावल्यामुळे ते थोडे थकबले; तों दुसरेंच प्रकरण मध्ये आले! - कारण हिंदू-हिंदूंच्या रूढीविषयक वादात शक्यतो बोलू नये, अशा शिष्टाचाराच्या अवलंब मिस ल्यूसी आणि पीरजादे यांनी करावा असे साधारपणे ठरले होते. पण भिंगार्डे वकीलांचे शेवटचे शब्द ऐकून पीरजादे यांस हसूच आवरेना! ते खदखदा हसू लागले. भिंगार्डे वकील त्यामुळे चिडून विचारतात - 'त्या तिथल्या माननीय सभासदास येवढें हसावयास काय झाले आहे? इथे काही तमाशा नाही!'

भिंगार्डे यांचें हे आव्हान ऐकून पीरजादेही खवळले, 'सांगणार नव्हतो वकिलसाब! पण आता स्वतःच विचारता म्हणून सांगतो. वडपिंपळ तोंडतो तो हाडाचा हिंदू  नव्हे, तो मुसलमानच असे आपण आता ठामपणे गर्जलात ना? म्हणून शंका आली - आपण स्वतः हिंदू की मुसलमान? कारण लोकहो चार वर्षांपूर्वी या भिंगार्डे वकील साहेबांनी माझी एक जमीन विकत घेतली. तीत चारपांच वडपिंपळ होते ते या वकीलसाहेबांनी स्वतः उखडून पाडून एक टुमदार बंगला बांधला! माफ किजिये वकीलासाब, लेकीन यह बात सच या झूट?'

साऱ्या सभेत एकदम हशा पिकला. भिंगार्डेही हसले. पण वकीलच तो! काहीतरी उत्तर येणारच त्याच्या तोंडून! सपकन्तो बोलनू गेले, 'अहो तेव्हा मीही एक सुधारकच होतो!

'मग आताही व्हा की दोन दिवस तसेच सुधारक नि तोडून टाका की तो वड!' पीरजादे लोकप्रियतेच्या ओघात सापडून वाहवत चालले, 'त्या सडकेवर दोनचार माणसें दगावतील त्या वडापायी! काय धर्मवेडेपणा बघा हे तुमच्या हिंदू  लोकांचें! आम्ही एक सोडून असे एकशे वड तोडून टाकू पण सडक आडवणार नाही. आम्हां मुसलमानात सारें 'रॅशनल'! झाडाची पूजा! असे म्हणून परीजादे पुन्हा एकदा खो खो हसले! पण या वेळी ते एकटेच हसत होते. लगोलग डॉक्टर मोहिते पुन्हा उभे राहिले नि म्हणाले,

'खांसाहेब, झाडाची पूजा मुसलमानात नसते. हाडांची असते! वड पाडू नये, त्याने आमच्या धर्मभावना दुखावतात असें हिंदू नुसत्या कोटिक्रमाने भांडत आहेत; पण पलीकडच्या वर्षीच जेव्हा हिंदूंच्या भर वस्तीतील एका घराच्या आतल्या चौकात काही कबरीसारखें बांधकाम असल्याचें, काही मुसलमान पिंजाऱ्यांनी त्या घरी कामकाजास जाताना पाहून ती पिराची जागा आहे म्हणून धिंगाणा घातला नि ते घर पाडून तिथे दर्गा स्थापून, निमाज पढून त्यास अडथळा होऊ नये यासाठी त्या साऱ्या हिंदू वस्तीतील वाद्यें बंद करावीत येथपर्यंत हट्टवादाचा

टप्पा गाठला, तेव्हा आपण स्वतः त्या मुसलमानांच्या म्हणण्याच्या समर्थनासाठी लाठीक्रमाने देखील भांडावयास सिद्ध झाले होतेत! ती पिराचीं चार हाडे सन्मानपूर्वक तेथून काढून दुसरीकडे पुरलीं असती तर? अशा हाडापायी कित्येक राजमार्ग हिंदुस्थानात बंद पाडण्यात येतात! मशिदीवरून राजमार्गानेसुद्धा वाद्यें वाजवू नयेत म्हणून प्रतिवर्षी मुसलमानांच्या दंग्यात किती डोकी फुटतात? खानसाहेब, धर्मवेडेपणा हा सर्व धर्मनुयांत आज तरी ह्या वा त्या स्वरूपाने भरलेला आहे. मनुष्यहिताच्या आड येणाऱ्या अशा भाबड्या धर्मभावना कोणत्याही समाजात असल्या तरी जो सुधारू इच्छितो तोच खरा बुद्धिवादी; खरा धर्मभीरु. कारण धर्म म्हणजे मनुष्य समाजाच्या उद्धाराचा, धारणाचा मार्ग, भिंगार्डे वकील माझ्याविरुद्ध म्हणून जे बोलावयास गेले तेच माझ्या विधेयाचें समर्थक झाले! ते म्हणाले वडपूजा नि देवप्रतीक मानण्यात आमचे पूर्वज चुकले नाहीत कारण वडपिंपळ हीं झाडें मनुष्यास अतिशय उपयोगी आहेत. मग मी तरी अगदी तेच म्हणतो आहे! पण त्यातूनच निघणारा उपसिद्धान्तही भिंगार्डे यांस कसा नाकारता येईल बरें? सिद्धान्त हा की,

गाईबैलांसारखे पशू काय किंवा वडपिंपळासारखीं झाडें काय, ती मनुष्यास अत्यंत उपयुक्त असतात, म्हणून त्यांच्याविषयी आम्हांस प्रेम वाटावें, त्या प्रमाणात किंचित् पूज्यताही वाटो. त्यांचें संरक्षण, पालन नि कौतुकही करणें आमचें कर्तव्य, ह्या अर्थीच काय तो, तो आमचा धर्म! पण त्याच्याच उपसिद्धान्तही हाच नव्हे काय, ज्या परिस्थितीत ते पशू वा ती झाडें मनुष्यास उपद्रव देण्यास कारण होतात, तेव्हा ती पालनीय वा रक्षणीय राहत नाहीत आणि जेव्हा त्यांच्या नाशानेच मनुष्य जातीचें वा राष्ट्राचें हित साधणारें असते, तेव्हा त्यांचा नाश हाच मनुष्यधर्म वा राष्ट्रधर्म होणार!

'या पायी मनुष्यें मेलीं तरी वड न पडला पाहिजे असे म्हणणे म्हणजे निर्भेळ मूर्खपणा आहे. भिंगार्डे वकील यांनी या कृत्यास शहाणपणा ठरविण्यासाठी केलेल्या बुद्धिवादानें हेच सिद्ध केले. धार्मिक अज्ञानाचें समर्थन विज्ञानाने - अद्ययावत् सायन्सने करू पाहणाऱ्या या सर्व अर्धवट लोकांचे कोटिक्रम हे नेहमी असेच त्यांच्या गळ्यांत येतात! यापेक्षा युक्तीवादाचा कोणताही ढोंगी मुखवटा न घालता या आमच्या शास्त्रीबोवांसारखे जो चक्क सांगतो की 'वड हा देव आहे - त्यास तोंडले तर तो आम्हांस शापतो असे शास्त्र आहे; त्यास आम्ही मानतो.' तो धर्मभोळा असला तरी लुच्चा नसतो. तरी त्यास इतकेच विचारणें पुरें आहे की, 'वडपिंपळ हे पदार्थ वस्तूतःच जर देव, तर ते स्वतःच कुऱ्हाडीने तोंडले, आगीत जाळले, वादळात मोडले कसे जातात! आणि त्यांना पूजले नाही वा तोंडले तर, जर वडोबा किंवा मुंजोबा रागावतो तर हे मुसलमान, ख्रिस्ती किंवा आमच्यासारखे सुधारक हिंदू त्यांना वाटेल त्या दुसऱ्या झाडासारखें माणसाच्या सोयीसाठी तोंडीत वा जाळीत असता ते आमचें काहीएक वाकडें कसे करीत नाहीत?'

'अहो डॉक्टर, तुम्ही वाऱ्याशी भांडता आहा! वडपिंपळ देव असे मी तरी कुठे म्हणालो? हे सारे भावनेच खेळ. शास्त्र चक्क सांगते 'न काष्ठे न च पाषाणे न शिलायाम्न च मृण्मये! भावे हि विद्यते देवो तस्माम्भावोहि कारणम्!!' आम्ही वडाच्या ठायी वडोबाची भावना ठेवून पूजतो म्हणून आम्ही तोंडले की आम्हांस पाप लागते, पाप नाश करते, पण ख्रिश्चन, मुसलमान वडापिंपळांना मुळी झाडेंच मानतात, ते त्यात दैवी भावना ठेवीतच नाहीत, म्हणून त्यांनी

वडपिंपळ तोंडले तर त्यांना पाप लागत नाही, देव त्यांना दंड देत नाही! वड आमच्या नवसास पावतो हे आमच्या भावनेचें फळ असेच का म्हणाना!' शास्त्रीबोवा म्हणाले.

'वा शास्त्रीबुवा! वा! लाखाची गोष्य बोललात ही! अहो, मग उत्तम मार्ग म्हणजे अशी अडाणी भावना मुळात ठेवू नये म्हणजे झाले! राक्षसाला प्रथम जाणूनबुजून राजा म्हणा की आणि नंतर राजा म्हणून त्याला बळी देत बसा का? दोरीला जाणूनबुजून साप समजा का नि नंतर थरकांपत तिच्यापासून पळा का? आम्हीही गायबैलांना पशू, वडपिंपळाना झाडें, असेच मानले आणि त्यांना पूजिले नाही. हा वड गैरसोयीची म्हणून कापू नि सोयीच्या ठिकाणी दहा वड दुसरे लावू! ह्या वस्तू मनुष्याला उपयोगी म्हणून प्रथम रक्षणीय ठरल्या, दैवी ठरल्या. पण पुढे ते उपयुक्ततेचे मूळ कारण विसरुन त्या वस्तूच रक्षणीय, पूजनीय देवता वाटू लागल्या. मनुष्याच्या अज्ञानयुगांतील चुकी आता या विज्ञानयुगात सोडून दिली पाहिजे!'

इतक्यात बाहरेच्या लोकांत मोठा गलगा झाला. डॉ. मोहित्याचें भाषण ऐकू येईनासें झाले. लोक दारात घुसू लागले, 'भिंगार्डे वकील!' म्हणून हाकावर हाका आल्या! भिंगार्डे वाटच पाहत होते जणू काय त्या क्षणाची! तो ताडकन उठून दाराशी आले आणि एक चिठ्ठी हातात घेऊन धापा टाकीत म्हणाले, 'सभा बंद करा! लोकक्षाभ अनावर होत आहे; कारण हे पाहा! ही चिठ्ठी भीमाबाई पाटलिणीकडून आली असून त्यात त्यांनी असे लिहिले आहे की, 'जर वड पाडाल तर मी त्या जागी मरतों उपास करीन!' लोक ओरडत होते, 'सभा बंद करा! आम्ही वड पाडू देणार नाही!' अध्यक्षही 'तडजोड अशक्य, सभा बंद!' असे सांगून उठून गेले. 'सनातन धर्म की जय' करीत लोकही हळूहळू परतले. जो तो भीमाबाईच्या श्रद्धेची नि देवलसीपणाची वाहवा करीत होता!

हे भिंगाड्यांचें अवसान पाहून भीमाबाई संतोषल्या. पाऊस वाढत चालला. वकील घरी गेले. 'वडाच्या पायाची धूळ अंगारा म्हणून मुलाला लावून माझ्या बाळास वडोबा शतायुषी करो!' असे म्हणून तिने त्याला झोपी घातले. दिवसभर थकलेली ती बाईही तशीच झोपी गेलीच वारा नि पाऊस वाढतच गेला!

रात्रीचे बारा वाजले असतील. त्या सडकेने एका लांब प्रवासाहून आलेली तट्टाची बैलगाडी अकस्मात्‌शिळंधार लागलेल्या त्या पावसात नि सोसाट्याच्या वाऱ्यात सापडून रेंगाळत, चाचपडत चालली होती. तोंच कडाड्कडाड्असे दोनचार आवाजावर आवाज झाले. ती सडकेवर आलेली त्या वडाची लांब फांदी तुटून भिरकावलेल्या गदेसारखी त्या गाडीच्या तट्टयास लागली; एखाद्या साहेबाची टोपी वरच्यावर उडवावी तसा तो तट्टया उडवून गाडीवर कोसळली; गाडीवान ठिकच्या ठिकाणी फटकाऱ्यासरशी ठार होऊन खाली पडला; तोंच त्या वडाचा तो मुळाशी खिळाखिळा झालेल्या उंच सोट उलट बाजूस कोलमडून पायथ्याच्या झोपड्यांवर पडला!

'अग आई ग!' अशी किंकाळी त्या छप्पीभिंतीसुद्धा कोसळलेल्या झोपडीतून आली! ती किंकाळी भीमाबाईचीच होती! कोसळलेल्या झाडलाकडाखाली तिचे डोके फुटले होतें, आणि त्या वडाच्या सोटाखाली, हाय हाय! तिचे ते लेकरू चेंदामेदा होऊन गेले होते!

***

## २.८ भक्तिविजयातील हरवलेला नवा अध्याय

गोष्टीचा मूळ सांगाडा अगदी सत्य, घडलेली गोष्ट; पण सांगताना नावे गांवें गाळून जरा जुळवून सांगितली गेली म्हणूनच काय ती तिला कथा म्हणावयाचें, असा जर सत्यकथा या शब्दाचा अर्थ केला तर आम्ही सांगत आहो ही एक शंभर टक्के सत्यकथा आहे. कारण ही गोष्ट अशी अगदी खरोखरीच घडली आणि तीही अवघ्या चारपाच वर्षांपूर्वी!

ज्या विठोबाचें देवळात ती घडली ते एक त्या नगरातील लहानसें, एक विरळ वस्तीत बांधलेले, भंडारी-मराठा इत्यादी वर्गातील कामकरी मंडळी कधीकधी ज्यात जात येत, असे बापडेसे देऊळ आहे. एक भाविक आणि निर्धन वर्गातील मध्यम वयाचा मनुष्य मात्र नेमाने त्या देवळाने जाऊन विठ्ठलाची पूजा करी. दिवसभर कामधंदा केल्यानंतर रात्री एकटा दुकटा कसाही असला तरी टाळ घेऊन 'वेडेवाकडें' हे विशेषण ज्यास लागू पडेल असे भजन नित्यनेमाने करी आणि गाता गाता गुंगी आली की तिथेच एकटा दुकटा निजे.

त्याच्या भाऊबंदांतील कोण्या बाईने त्याच्या घरदारात भाग मिळावा म्हणून भांडण काढले होते. तिला कोणी सांगितले, ह्या भाबड्या माणसाचा काटा जर वाटेतून निघेल तर! - तो भयंकर विचार तिला पटला. गुंड लोकांच्या संगतीत ती फसलेली होती; त्यांनी काही ठराविक रक्कम घेऊन तिचे ते काम पारही पाडून टाकण्याचें अंगावर घेतले!

त्या चांडाळचौकडीवाचून तो मनुष्य एक भाबडा आणि निरूपद्रवी प्राणी म्हणूनच तेथील लोकांना परिचित असे. त्याचा देवलसीपणा पाहून त्याला कोणी कोणी बुवाही म्हणत. त्याच्याशी नेहमी भांडण करणाऱ्या त्या बाईच्या वळणातील त्या गुंड लोकांनी त्याला हाणमार करण्याच्या धमक्याही दिल्या आहेत हे ऐकून एकदोघांनी बुवास सांगितलेही होते की, 'रात्री बेरात्री जपून राहात जा! ती वाईट माणसें आहेत!' पण गजेंद्रमोक्षाच्या, दामाजीच्या, द्रौपदीच्या, चोखोबाच्या, कबीराच्या ज्या अनेक कथांची त्याने पारायणें केलीं होती त्यांतील कोणाची तरी कथा सांगून त्याने म्हणावे, 'एकटा असलो, दुकटा असलो तरी माझा पाठीराखा पांडुरंग माझी पाठ राखीलच राखील!' असे म्हणत विठ्ठलाच्या मूर्तीकडे त्या मिणमिण्या समईच्या अंधुक उजेडात पाहून त्याने अभंग आळवावा 'जेथे जाई तेथे तू माझा सांगाती! संभाळिसी हाती धारुनिया!!

खून ! खून ! ! अरे बापरे ! भयंकर खून !!!

पाहाटेच्या वेळी कुणी मनुष्य त्या विठोबाच्या देवळातून जात असता अकस्मात् मोठमोठ्याने बोंब ठोकीत ओरडला.

आजूबाजूच्या घराझोपड्यांची कवाडें, खिडक्या खाडखाड उघडून कोणी उघडे, कोणी बोडके असे काही लोक अंथरुणावरून उठले, तसेच तिकडे धावत आले.

त्या बुवाला कोणीतरी भयंकर हत्यारांनी घायाळ करून शेजारच्या शेतात फेकले होते. रक्ताच्या डबक्यात तो मरणाचा घोर लागून पडलेला त्या बोंब मारणाऱ्या वाटसरूस दिसला होता. भोवती जमलेल्या मराठा-भंडारी वर्गाच्या बायामाणसांसुद्धा सगळे हळहळत होते.

बुवाला कण्हू लागला होता, मधून मरणाच्या धक्क्यासरशी उचक्या येत; पण तो मेला नव्हता. लोकांतून एकास एक म्हणू लागले, 'ऐकलेत? बुवाच्या तोंडी विठाल ! विठाल !' 'उचकीसरशी येतो खराच तो ध्वनि.' 'देवाचें नाव सुटलें नाही त्याचें!' 'धावा करतो आहे देवाचा!' देवाला ह्या धाव्यासरशी ही बातमी पोचली तर विठोबा अजूनही येऊन त्याला हात देतील.' बुवा म्हणतच असे 'जेथे जाई तेथे तू माझा सांगाती! वागविशी हाती धरुनिया!'

पोलिस घाईघाईने पहिले लिखाण थोडेंबहुत करून बुवाला रुग्णालयात धाडून देऊ लागले. काही लोक परत जात होते - काही येत होते. काही आपसांत म्हणत होते, 'बुवाने विठ्ठलाच नामघोष चालविला आहे!' 'बुवा मरणार नाही!' 'अहो, मरायचा असता तर इतक्या घावांतून वाचलाच नसता!' 'अहो, तो देवळात असता तर घायाळच झाला नसता!' विठोबा जागृत दैवत, पण देवाच्या पाठीमागे या शेतात मारेकऱ्यांनी घात केला त्याला काय उपाय!' 'देव द्वारकेत होते म्हणून द्रौपदीमातेस दु:शासन गांजू शकला; पण तिचा धावा कानावर पडताच देव धावले तेव्हा तिचे तो काडीभरही वाकडें करू शकेना!' पोलिसही म्हणतच होते की, 'त्या मारेकऱ्यांची आम्हांस बित्तंबातमी मिळाली आहे. शेवटी त्यांचाच नाश होणार!' 'अहो, सत्यमेव जयते! नानृतम्!!' पूजेला चाललेले भटजी विटाळ होऊ नये म्हणून लोकांच्या वाटेच्या बाजूस होते ते, जाता जाता म्हणून गेले.

जमलेल्या थव्यापैकी तीच वाक्यें घोळीत मुली शाळेत गेल्या. मुलें शाळेत गेलीं, बाया घरी गेल्या. भाजीवाल्या बाजारात गेल्या. कामकरी कामधंद्यावर गेले. सकाळचे दहा वाजत आले. दोन तीन पोलिस जाग्यावर टेहळीत होते. काहीजण दुरून पाहत जात होते. एकदोघेच देवळात जाऊन विठोबावर पाणी घालून घाईघाईने पूजेचा नियम कसाबसा पाळून निघून गेले होते.

साडेदहा वाजून गेल्यामुळे त्या नगरातील एक प्रमुख वकील असताही सार्वजनिक कथाकीर्तनांतून भाग घेणारे स्नानसंध्याशील गृहस्थ पांडुरंगराव हे कोर्टात जाण्यासाठी उठू पाहत होते. पण त्यांच्या बैठकीत जमलेले लोक वादाच्या भरात आल्यामुळे तेथून काही हालेनात. जो तो बुवाच्या झालेल्या हत्येची काही तरी नवीन अद्भूत माहिती घेऊन तिथे येई. पांडुरंगराव स्वतः संतलीलामृतादी ग्रंथांचे मोठे चाहते असल्यामुळे बुवाच्याविषयी घडत चाललेल्या घटनांचा त्यांसही विस्मय वाटू लागला होता. इतक्यात मोरे नावाचे तेथील खोतच आत आलेले पाहून पांडुरंगराव म्हणाले, 'तुम्ही आता अगदी चुप बसा. सुसंगत बातमी आणण्यासाठी गेलेले खोतच आता काय सांगतील ते खरें! काय मोरे, बुवा रुग्णालयात शुद्धीवर आला हे खरें काय?'

'खरें म्हणजे काय विचारता, पांडुरंगराव! अहो, त्याने जो विठ्ठल विठ्ठल' उचकी-उचकीसरशी नामघोष चालविला होता ना त्या धाव्याने द्रवून तिकडे प्रत्यक्ष विठोबाच्या डोळ्यांतून अश्रूंच्या धारा लागल्या आहेत, मूर्तीच्या अंगास घाम सुटला आहे - आणि इकडे बुवा साफ उठून बसून भजन करीत आहे. औषध न लावता रक्तप्रवाह बंद झाला!'

'आश्चर्य! काय? विठोबा रडू लागतो? अगदी प्रत्यक्ष पाहतात लोक?' अशा उद्गारांची, प्रश्नांची, आश्चर्याची एकच सर झाडली. मोरे ह्या झडीतील शेवटच्या बिंदूस झेलून म्हणाले, 'कोणी प्रत्यक्ष पाहिले काय विचारता? शेकडो लोक जाऊन येताहेत विठोबाच्या देवळात. साऱ्या

बाजारात जो तो म्हणत आहे - विठोबा रडत आहेत! आणि बुवा उठून बसला आहे! भक्ताच्या दुःखाने देव कळवळले, नेत्री अश्रुधारा वाहत आहेत! जणू काय भक्ताला ते घाव न लागता देवालाच ते लागले!'

'संत चोखोबाविषयी अशीच आख्यायिका आहे' गंभीरपणे पांडुरंगरावी म्हणाले, 'त्याला मारलेल्या चापट्यांनी देवाचे गाल सुजले. चोखोबांच्या डोक्यावीर काठी पडे नि विठ्ठलाच्या मूर्तीच्या डोक्यावर टेंगूळ उठे. ग्रंथांतरीचे चमत्कार आज आम्हांला प्रत्यक्ष पाहावयास मिळतात! सुधारक मतांनी या नगरातील लोकांनी ढळू लागलेली भक्तीवरची श्रद्धा पुनः बसावयासाठीच विठ्ठलाने हे नाटक कशावरून केले नसेल?

'मी म्हणतो, डॉ. विचारे हे जे त्या सुधारकांचे अग्रणी त्यांसच हा चमत्कार दाखवावा! डॉ. विचाऱ्यांची लोकमतावर मोठी छाप पडते!'

'मीच म्हणणार होतो ते, मोरे, डॉक्टर विचारे माझे मित्र आहेत. बुद्धिवादी आहेत - पण हट्टवादी नाहीत. आणि प्रत्यक्ष गोष्टीस, बुद्धिवादी झाल तरी नाकरणार कसा! पण आता त्यांच्याकडे जावें तर कोर्टास उशीर होतो. संध्याकाळी मी डॉ. विचारे यांस घेऊन विठोबाच्या देवळात स्वतःच येतो'.

पांडुरंगरावांच्या ह्या अडचणीची टर उडवून मोरे म्हणाले, 'कोर्ट! तुम्ही वकिलांना वैकुंठास न्यावयाला विमान आले तरी तुम्ही कोर्टाला उशीर होतो म्हणून ते परत धाडाला! अहो, ज्ञानेश्वर-तुकारामाच्या कालापासून न घडलेली अशी देवाची कारणी आज इथे घडत असता, भक्ताच्या दुःखाने विठोबा रडत आहे तोच, तो सोहळा लगेच प्रत्यक्ष न पाहता म्हणे कोर्टाला उशीर होईल म्हणून संध्याकाळी जाऊ! संध्याकाळपर्यंत मूर्तीचें रडें बंद झाले तर? तें काही नाही. वकिलमहाशय, आता चलायचें डॉ. विचाऱ्यांकडे, नि त्यांना घेऊन विठोबाच्या देवळाकडे!'

सर्वांनी 'हो हो चलाच!' म्हणून गिल्ला केला. तेच ठरले. खोत, मोरे नि पांडुरंगराव वकील डॉ. विचाऱ्यांकडे निघाले. काही मंडळीही बरोबर चालली.

मार्गाने सकाळच्या शाळेतून सुटलेलीं, दुपारच्या शाळेत जाणारीं मुलेमुली, बाजारातील थवे, येतीजाती मंडली, जो तो दुसऱ्यास विचारीत तरी होता वा सांगत तरी होत - तीच अद्भुत गोष्ट, विठोबा रडतो आहे!

पांडुरंगरावास वाटू लागले, आपण ज्ञानोबा-तुकारामांच्याच देवलसी काळात क्षणभर वावरत आहोत! रेडा वेद बोलतो आहे, पंढरीनाथाचें देऊळ फिरले आहे! देव जनीबरोबर दळत आहेत! रोहिदासाबरोबर जोडे शिवत आहेत! अशीं अद्भुत वृत्ते त्या काळी लोक एकमेकांस असेच उत्तेजित होऊन सांगत असतील! त्या विचारात तन्मय होता होता त्यांस वाटले, 'अहाहा! जर आज एखादे महिपती असते! या बुवाचे या भक्तिविजयाचें आणि देवाच्या या रडण्याचें त्यांनी किती रसाळ वर्णन केले असते!' त्यांचें चित्त त्या विचारात इतके तल्लीन झाले, की चालता चालता, महिपती आज असते तर त्यांनी जो रसाळ अध्याय लिहिला असता त्यातील काही संभवनीय ओव्या जुळत चाललेल्या देखील त्यांस दिसू लागल्या! मनातल्या मनात ते त्या वाचू लागले - 'ओम नमोजी पंढरीराया! अतर्क्य ममता अतर्क्य माया! भक्तदुःखे देवराया! रत्नपुरीं

रडलासी !!१!! धन्य धन्य तो बुवा संत! ज्याचेनि कारणे भगवंत! कटी ठेवूनिया हस्त! रडत राहावा !!२!! संता गांठोनी मारेकरी! घाव घाली घावावरी! देव त्या दुःखें राउळीं! रडू लागले!!३!! भक्तिविजयातील या नव्या अध्यायाची अशी काही रूपरेषा जुळते न जुळते तोंच डॉ. विचाऱ्यांचें घर आले.

'या पांडुरंगराव! माझ्या इथे आधीच ही पाहा मंडळींची झालेली दाटी! जो तो म्हणतो विठोबा रडत आहे! मोठा चमत्कार घडतो आहे!' डॉ. विचारे हसत म्हणाले.

'मग तुम्ही एकदा चक्क सांगून तरी टाका, की तुमचा चमत्कारावर विश्वास नाही - मग शेकडो लोक प्रत्यक्ष ही गोष्ट पाहत असले तरी ते सगळे आंधळे!' पांडुरंगराव जरा त्रासिक स्वराने खोचून म्हणाले.

'अहो, चमत्कार जर घडला असेल तर तो चमत्कार असला तरी मी त्यावर विश्वास ठेवणारच ठेवणार. कारण जे कधी पाहिले नाही ते घडते किंवा जे घडते त्याचा उलगडा आपल्या ज्ञात कार्यकारणसंबंधाने लावता आला नाही म्हणजे त्यास आपण चमत्कार म्हणतो इतकेच त्याचें चमत्कारित्व. मनुष्यास सृष्टीचे सर्व नियम अजूनही कळले असे आम्ही समजत नाही. उलट आम्ही म्हणतो, सृष्टीच्या विश्वरूपाच्या नखाचेंही पुरते दर्शन अजून आम्हां मनुष्यांस झाले नाही. पूर्ण रूप दिसणें तर असंभवनीय! तेव्हा चमत्कारास वाव हा नेहमीच असणार. प्रश्न, घडले ते चमत्कारिक की साधें हा नाही; प्रश्न आहे तो हा की, घडले म्हणून जे म्हणतात ते तसेच घडले आहे की काय? बरें, तो बुवा जिवंत झाला, रक्तस्राव आपण होऊन बंद झाला, ती बातमी अगदी पक्की का?'

'अगदी पक्की! बुवा खडखडीत बरा होऊन बसला आहे. स्वतः सिव्हिल सर्जन डॉक्टरांनी तोंडात बोट घातले, आश्चर्याने शेकडो लोक पाहून आले!' मोरे उत्तेजित स्वरात म्हणाले. बुवा विठोबास नेहमी आळवीत ''जेथे जाई तेथे तू माझा सांगाती, वागविशी हाती धरोनिया!!' ते उगीच नाही!''

डॉ. विचाऱ्यांच्या या प्रश्नाने जरा अचंबा वाटल्यासारखें पाहत सिव्हिल सर्जन म्हणाले, कोणता बुवा? ते सकाळी खुनाचें प्रकरण माजले तो बुवा की काय? कां त्याची एवढी चौकशी? आम्ही रुग्णालयात त्याला आणला तोंच मुळी जवळजवळ मेल्यासारखा. दहा पांच मिनिटात तो लगेच मेला?'

पांडुरंगराव दचकून खुर्चीवरून अर्धे उठले, 'म्हणजे! तो खडखडीत बरा झाला, त्याचा रक्तस्राव आपोआप बंद झाला, तुम्ही डॉक्टरांनीदेखील आश्चर्याने तोंडात बोट घातले- हे सगळें-!'

'साफ खोटे! बुवा मेला तेव्हा मी काही तोंडात बोट घातले नव्हते; ही तुमची भोळसट कथा ऐकून मात्र आश्चर्याने तोंडात बोट घालावेसें वाटते खरें! कोणी सांगितले हे तुम्हांला?'

'ह्या खोतांनी! शेकडो लोक ते स्वतः पाहून आले म्हणून हे म्हणाले. काय खोत?'

'हो तुम्हांलां मी सांगितले खरें; पण मला स्वतः भिकंभटांनी सांगितले, शेकडो लोक पाहून आले!'

डॉ. विचारे हसणार होते; पण प्रकरण चिडीस जाऊ नये म्हणून गंभीरपणे सिव्हिल सर्जनांना विचारू लागले, 'बरें, पण मरणाआधी शेतात घायाळ होऊन पडलेला असता शेकडो लोकांसमक्ष 'विठ्ठल, विठ्ठल' म्हणून त्याने नामघोक्ष चालविला हे तरी खरें ना?'

सिव्हिल सर्जन पुन्हा एकदा मानेला तिरस्काराचा झटका देऊन उसळले, 'छट्! साफ खोटें! अहो, त्याच्या खुनाची बोंब होऊन दहापांच लोक जमतात तों मी सरकारी नात्याने तिथे पोचलो. शेकडो लोक कुठले! बेशुद्ध, मृतप्राय, दहापांच उचक्या आल्या असतील नसतील! श्वसोच्छ्वासाला 'कोहं? सोहं!' असे जपणारी 'अजपा गायत्री' असे नाव वेदान्ती जसें देतात तसे मरणाच्या उचकीस 'विठ्ठल' असे नाव द्यायचें असले तर माझें काही म्हणणे नाही! अहो, मरणाची घरघर, दोनचार उचक्या, यापलीकडे ब्र ही त्या बुवाच्या तोंडून निघण्यापूर्वीच तो मरूनही गेला होता!'

'बरें, ते असो.' डॉ. विचारे उपाहासाचा लवलेश अवलंब न करता एखाद्या न्यायाधीशासारखे काटेतोल बोलू लागले, 'आता विठोबाच्या मूर्तीच्या डोळ्यांतून या भक्ताच्या घाताने दु:खाश्रूंच्या धारा लागल्या आहेत, अंगास दरदरुन घाम सुटला आहे, अशी जी बातमी गांवभर पसरली आहे ती घटना तरी कोणी प्रत्यक्ष पाहिली आहे का?'

'शेकडो लोकांनी!' मोरे ठासून म्हणाले. सारा प्रदेश शत्रू हस्तगत करीत आल्यानंतर शूर सेनापती शेवटचा बालेकिल्ला तरी पडू द्यावयाचा नाही, अशा बाण्याने जसें अढळ ठाण मांडतो तसे अढळ ठाण मांडलेले ते उत्तर पुन्हा देऊन मोरे म्हणाले, 'शेकडो लोकांनी ते प्रत्यक्ष पाहिले'!

'तुम्ही स्वत: पाहिलेत का?'

'नाही! मी जातोच आहे तिकडे स्वत: बघावयास!'

'बरें. पांडुरंगराव, तुम्ही स्वत: पाहिलेत?'

'नाही! पण साने आणि गाडगीळ यांनी स्वत: पाहिल्याचें ऐकतो.' पांडुरंगरावांनी पुरावा दिला.

'हे इथेच आहेत पाहा साने आणि गाडगीळ! तुमच्याआधीच ते आले होते. काय साने, तुम्ही मघा सांगितलात तो अनुभव कृपा करून पुन्हा सांगा एकदा' डॉ. विचाऱ्यांनी विनविले.

'मी मघा सांगितलेच, की मी ही बातमी ऐकून आश्चर्याने थक्क होऊन देवळात गेलो होतो, पण दाटीमुळे मूर्तीजवळ जाता आले नाही. त्यातही गाभारा अंधारलेला. मला काही तसा प्रकार आढळला नाही. पण गाडगीळ पुढे होते, ते म्हणाले, की मूर्तीच्या डोळ्यांतून धारा वाहत आहेत, म्हणून तेच मी म्हणालो.' सान्यांचा पुरावा संपला. मंडळी हसू लागली; पण डॉ. विचारे हसत नाहीत पाहून दबली. डॉ. विचाऱ्यांनी गाडगीळांना 'आपला अनुभव?' म्हणून पृच्छा केली.

'मी अंधारलेल्या गाभाऱ्यात जर काही पाहिले असेल तर ते इतकेच की विठोबाच्या मूर्तीचे डोळे नी गाल ओलसर दिसत होते, आणि काही बाया मंडळी म्हणत होती- 'अयाया, विठोबा रडतो आहे!'

'पण गाडगीळ, तुम्ही स्वतः मला म्हणालात, विठोबाच्या डोळ्यांतून धारा वाहत आहेत!' सान्यांनी हटकलेच.

'आणि तेवढेंच खरें आहे!' डॉ. विचारे सर्वांकडे पाहून म्हणाले, 'हे चंद्रचूड इथे आहेत. हे पाहा आणि मी पोलिस चौकशी प्रथम चालू होती तेव्हाच, म्हणजे देवळात दहापांच लोकदेखील गेले नव्हते तेव्हाच तिथे गेलो. त्यावेळी कोणी ह्या मूर्तीच्या डोक्यावर पाणी ओतून घाईघाईने एकदोन फुले पायांवर टाकून निघून गेले. त्या देवळात तो बुवाच काय ती नीट पूजा करी. मूर्तीचे अंगबिंग नीट पुसण्यास दुसरा कोण आज येणार? ते तसेच रहिले. आम्ही चौकशीचा रागरंग पाहून परततो तों त्या ओतलेल्या पाण्याचे थेंब नि ओलावा तोंडावर पाहून दोघेतिघे 'विठोबाच्या डोळ्यांतून पाणी येत आहे बघा!' म्हणून आश्चर्यचकितपणे म्हणताना आम्ही ऐकले! त्यांस खरें कारणही आम्ही सांगितले; पण त्यांस ते पटलेले दिसेना. आम्ही परतलो आणि पाहतो तो तीन तासांत गांवभर 'विठोबा रडतात!' ही एकच हुल्लड उठली आहे!! दुसरें असे पाहा, की प्रथम जेव्हा विठोबासमोर बुवावर त्या दुष्टांनी घाला घातला -

'चूक! चूक!' मोरे निराशेच्या अवसानाने मध्येच उसळले, 'देवासमोर बुवावर घाला पडला नाही. वाटेत, देवाच्या पाठीमागे शेतात त्याला गाठला. देवाच्या समक्ष काय माय व्याली होती त्या दुष्टांची!'

'छट्छट्! काय बकता आहा!' सिव्हिल सर्जन तिरस्काराचा झटका मानेस पुन्हा देत कातावले, 'अहो, बुवाला रात्री नेहमीप्रमाणे देवळात निजलेला शेजारच्या माणसांनी पाहिला. मध्यरात्री देवळात छपरावरून उतरून बुवाच्या तोंडात बोळा देऊन, दोनचार घाव घालून, फरफटत मारेकऱ्यांनी बाहेर नेला नि शेतात फेकला! उपसलेलीं कौले, तोंडातला बोळा, देवळाच्या उंबरठ्यापर्यंत रक्ताचें उडालेले डाग, शेतापर्यंत रक्ताळ भाग - सारा पुरावा माझ्या समक्ष पाहून पंचनाम्यात नोंदला आहे!'

सुरेख मांडत आणलेली गौर खालची घडवंचीच अकस्मात् पडून ती सारी शोभा कोसळली असता तो ढीग पाहून मुलींना जसे खट्टू वाटते तसे पांडूरंगरावांचे मन खटटू झाले. चमत्काराला चमत्कार जुळत जुळत कोण रसाळ कथा - भक्तिविजयांत शोभावा असा किती प्रासादिक तो त्यांच्या मनात जुळत आलेला देवलसी अध्याय! कोणीतरी कोट पाटलूण घातलेला राक्षस महिपतीच्या हातातनू हिसडून लिहिता लिहिता फाडून टाकीत आहे असे त्यांना मनातल्या मनात भासून गेले! खोत, मोरे तर रागारागाने त्या सिव्हिल सर्जनांना राक्षस म्हणून उघड उघड म्हणण्याच्या बेतात होते; पण इतक्यात मनधरणीच्या हळुवार शब्दांत डॉ. विचारे म्हणाले,

'तुम्ही सर्वजण असे पाहा, की आपण भाबड्या भक्तीने देवची थोरवी वाढविण्यापायी त्याला उलट आपण माणसासारखा दुबळा करून सोडतो. माणसास देव करील ती खरी भक्ति; देवास माणसासारखा अंधळा, दुबळा, रडवा, खुळा बनवील ती भक्ति की भाबडेपण! तो बुवा जे म्हणे की

जेथे जाई तेथे तूं माझा सांगाती!

सांभाळिसी हाती धरोनिया!!

ते तात्विक अर्थी न घेता शब्दश: जर खरें समजावयाचें तर त्यास दुष्टांनी देवळांत न गाठता शेतात गांठले असे मानले तरी कोणचा फरक होणार? देव शेतातही त्याचा सांगाती होताच - मग तिथेही त्यास कां सांभाळला नाही? मारेकरी येणार हे त्यास देवाने आधीच का कळविले नाही? खरा देव भक्ताच्या कैवाराने त्या दुष्टांस पकडून हापटण्याकरिता त्यांच्यामागे धावता का विटेवर एखाद्या बाईबापडीसारखा मुळ-मुळू रडत बसता? जर ती विठोबाची मूर्ती खरोखर रडू लागली ना तर मला अशा दुबळ्या मूर्तीची उलट चीड येती! पण तरीही तसे घडले असते तर मी ते मानले असते! पण त्या बहुतेक, निदान बऱ्याचशा संतविषयक कथा ह्या अशाच सांगोवांगी बातांवर रचलेल्या सुरस कादंबऱ्या आहेत! रसाळ पण अतथ्य, अपथ्य! देव म्हणे रडतो! भक्तांचा सूड घेत नाही; तर रडतो!'

'किंवा संत दामाजीस छळणाऱ्या त्या मुसलमानी सुलतानास हात धरून गादीखाली खेचायचें सोडून उलट जोहार करीत दंड भरतो!' सिव्हिल सर्जन मध्येच म्हणाले,

'पण ती कथाही जितकी सुंदर तितकीच खोटी. त्याच नावाच्या एका महाराने दंड भरला; जसा, आज कोण्या निमित्ताला टेकलेल्या सत्याग्रह्याचा दंड त्याचा आप्तेष्ट निनावीपणे भरतो नि त्याची सुटका होते. त्या विठू महाराचें घर विद्यमान आहे नि त्यांच्यापाशी ह्या घटनेचे लेख आहेत! पण आज ज्या भाबडया प्रवृत्तीन विठोबास रडविले, तिनेच त्या विठूमहारास विठ्ठलाचा अवतार बनविले! बरें झाले, आज एखादा महिपती महाराष्ट्रात नाही, नाहीतर ही आजची रडकथा फुगत फुगत तिकडे पोचून त्या बिचाऱ्या भाविक ग्रंथकाराने प्रामाणिकपणे तिचा एक भक्तिविजयातील प्रासादिक अध्याय बनवून सोडला असता! असो, झाले ते झाले. पण मी म्हणतो जर ते दैवत जागृत असेल तर जरी मारेकऱ्यांना स्वत: मरण्याचें त्यास साधले नाही तरी निदान त्याने इतके करावें, की ते मारेकरी कोण हे आज उद्या पोलिसांच्या स्वप्नात जाऊन सांगावें आणि त्यांचे रक्ताळलेले कपडे, हत्यारें, कुठे आहेत ती अचानक पकडून द्यावी! गुप्तपोलिसांपेक्षा तरी देवाला काही अधिक अंतर्ज्ञान असावयास हवें! इतके झाले तरी आम्ही त्यास एक चमत्कार म्हणू! काही दिवसांनी पोलिसांनी दोनचार गुंड पकडले, खटले भरले; पण पुरावा कच्चा पडून सारे आरोपी सुटले. ते खुनांचे प्रकरण नव्हे तर त्याची आठवणही सर्वांनी रद्दीत काढली आहे. झालीच कधी आठवण तर 'विठोबा रडतो!' हा चमत्काराचा विषय म्हणून नव्हे, तर चेष्टेचा म्हणून!

***

## २.९ विटाळाचें वेड

'काळू! आलास का एकदाचा शाळेतून? शाळेतलीं मुलं मघाच घरोघर जाऊन जुनीपुराणीं देखील झालीं नि तू आता घरास पोचलास काय रे? दहाला शाळा सुटायची नी तुला दहा पावलांवर घरी यायला अकरा वाजायचे! थांब मेल्या, हे उचटणं तर बघ कसं लाल करून ठेवलं आहे, डाग देते थांब, ये असा! हं हं हं चुलीपाशी. अरे चल! हट्‌मागं, धटिंगण मेला! पाय धुतल्यावाचून सैंपाकघरात पाऊल टाकता कामा नये! जोडा घालूनच आत आला नाहीस हेच उपकार!'

'कोणाचं अडल होतं पाऊल टाकायला!' काळू हीः हीः हीः हसत आईला म्हणाला, 'तूच म्हणालीस ये आत डाग देते, म्हणून आलो! पण काकू, आज तापलेले उचटणं नाही अं - आज पहिल्यान चाकोलेटची पेटी काढ कुठं आहे ती! गेल्या महिन्यापर्यंत माझा मराठी चौथीत चौतिसावा क्रमांक असे, म्हणून हिणवीत होतीस नं?'

'मग आज कोणचा असा पराक्रम करून आला आहेस काळू? गेल्या महिन्यात तुझा क्रमांक चौतिसाचा तेहतीस तरी झाला का? एका क्रमांक जरी वर गेला असला न, तरी चाकोलेट देईन बरं काळू!'

'तर मग ऐक! आज आमचे नवे क्रमांक लागले, त्यांत माझा अठरावा क्रमांक आला.'

'काय म्हणतोस? काळू, खोटं ठरलं तर थोबाड फोडीन अं!'

'शपथ! काकू! माझा खरोखरच आठरावा क्रमांक आला आज वर्गात!'

'भले वीर! आमच्या काळूची बुद्धी वाईट नाहीच मुळी! पण उनाड नि अचरट! या महिन्यात अभ्यास केलास तर बघ एकदम सोळा क्रमांक वर चढलास ना! ही घे, चाकोलेटची भरलेली पेटीच घे हो बाळ! बघ, पेटी दिली न? जर तू पुढच्या महिन्यात आणखी सोळा क्रमांक वर गेलास न, तर अशा दोन पेट्या देईन मी तुला! अभ्यास केलास की क्रमांक वर गेलाच पाहिजे बरं तुझ्यासारखा बुद्धिमान मुलाचा!'

'अग काकू, अभ्यास कशाला हवा?' चाकोलेटांची पेटी घेऊन सैंपाकघरातून मधल्या घरात सुरक्षित अंतरावर गेलेल्या नि चाकोलेटांचा बोकणा तोंडात कोंबलेल्या काळूने अडखळत बोलण्यास आरंभ केला, 'अभ्यासाच ग कशाला हवा? माझ्या वर्गात चौतिसाव्या क्रमांकावरून मी जो आज एकदन सोळा क्रमांक वर चढून आलो, तो अभ्यास न करतासुद्धा वर आलो - हीच तर खुबी! बघतेस काय अशी काकू? शपथ! अभ्यास मी मुळीच केला नाही. अग, ते असं झालं- सांगतो अं - चाकोलेटांचा आणखी एक बोकणा भरुन काळू एक पाय मधून मधून वेळीत नि शांतपणे हसत हसत सांगू लागला, 'अग, माझ्या वर्गात चौतीस मुलं नव्हती का? तेव्हां मी चौतिसावा नव्हतो का? आता आज काय झालं की आमच्या शाळेच्या उलट पक्षाची ती दांडेकर शाळा आहे ना? त्यांनी पुष्कळ पालकांना आमच्या शाळेविरुद्ध मथविलं, आणि त्यामुळे आज आमच्या वर्गातील पंधरासोळा खालचीं मुलं आमची शाळा सोडून या महिन्यापासून दांडेकरांच्या शाळेत निघून गेलीं. उरलीं अठरा. तेव्हा मास्तर म्हणाले, मिळून रांगेनं बसा नि नवे क्रमांक मोजा! तेव्हा मी नुसता सरकलो नि अठरावा आलो! असाच आणखी एखादा लग्गा लागला तर पहिलाही पण येईन हो काकू! अभ्यासच ग कशाला हवा त्याला?

इतक्यात ताडदिशी एक लाटणें काळू होता तिथे येऊन आदळले. पण अनुभवाने ते तिथे काकूकडून फेकलें जाणार हे आगाऊच ओळखून झटकन् मागे पळून जाण्यासाठी सज्ज असलेल्या काळूने एक मागे उडी घेतली, पुन्हा झेप घालून ते लाटणें उचलले नि हटत हटत जोडे-वहाणा ओटीवर ठेवीत तिथपर्यंत तो खिदळत आला. त्याचा पाठलाग करीत काकूबाईही पुढे पुढे घुसल्या. पण काळू जोडे-वहाणा होत्या तिथे जातो हे पाहताच त्यांचें अवसान खचून रागावण्याच्या ठायी त्या काकुळती येऊन म्हणून लागल्या, 'अरे, जोडे! शिवशील मेल्या माझं

ते सोळ्यांतलं लाटणं घेऊन! दे रे बाबा ते इकडे एकदाचं! नाही, नाही, नाही मारणार पुन्हा फेकून! अरे शिवशील! त्या वहाणा! अरे-!'

'मग नाही ना मारणार? नाही ना?'

त्यांचें हे करारपत्र नक्की होते आहे तोंच एक टपाली आवाज दाराकडून त्यांच्या कानावर आला- 'विष्णुपंत देवधर!' मागोमाग एक पाकीट भिरदिशी दारात पडलें.

'बाबांचं आलं पत्र! फोडू काय ग काकू मीच?' आईला तोंडाने असे पुरते विचारून संपले नाही तोंच काळूच्या हातांनी ते पत्र फोडलेही होते!

'फोडलंस एकदाचं पाकीट! पण वाचता येतंय्का एक अक्षर तरी?'

'काय समजली आहेस तू काकू? आता मराठी चवथीतला अठरावा क्रमांक आहे माझा! वा, अक्षर पण स्वच्छ बाळबोध! हात्येच्या! हं, ऐक, वाचतो.'

काही अडखळत पण एकंदरीत स्पष्ट अर्थ कळेल असे काळूने वाचलेही ते पत्र. दहापाचच ओळी होत्या त्या-पण त्या ऐकताच अनुकाकू थंडगार होऊन उभ्या राहिल्या! त्या पत्राचा सारांश त्यांच्या लक्षात ठसठशीतपणे आला; तो हा की, ब्रह्मावर्ताकडे विष्णुपंत देवधरांच्या चुलत आजोबांच्या कुटुंबापैकी एक वृद्ध गृहस्थ, 'दशांत'ला कोणी एक आप्त वारला असून त्याला तो चवथा दिवस होता! अर्थात्चुलत आजेसासऱ्याच्या शाखेकडचें ते सुतक अनुकाकूंनाही आलेच होते! त्या बातमीने थोडा वेळ सुन्न होऊन अनुकाकू उभ्या होत्या तोंच काळू ते पत्र गाद्यांच्या ढिगाऱ्यावरच्या फळीवर ठेवण्यासाठी उडी मारून त्या गाद्यांच्या ढिगावर चढला! त्या धक्क्यासरशी अनुकाकू विंचू डसावा तशा अकस्मात् किंचाळल्या,

'अरे काळ्या, काळ्या, सुतक न मेल्या! उतर खाली! कालविला ग बाई विटाळ ह्या कारट्यानं!'

काळूदेखील त्या किंचाळण्याने थोडा दबकला, बाजूस झाला. तोंच विष्णुपंतही बाहेरुन घरी आले, 'काय झालं काय?' म्हणून आपल्या पत्नीस विचारताच अनुकाकूंनी त्या आपल्या पतीकडे जळफळत पाहून बातमी दिली.

''व्हायचं काय? ते असतात न कोणीसे आपल्या चुलत आजोबांचे भाईबंद तिकडे ब्रह्मावर्तास? कधी तुमच्या वा माझ्या जन्मात तोंडेदेखील पाहिलीं नाहीत एकमेकांचीं! त्यांचं कोणीसं मेलं आहे! बर, मेलं तर मेलं, नवव्या दिवशी तरी कळवावयाचं न की स्नान केलं नि सुतक फिटलं! पण उभ्या जन्मात ज्यांना एकसुद्धा पत्र टाकायची घाई कधी होत नाही, त्यांना मरताना मात्र सगळ्या भाउबंदांना सात पिढ्यांची ओळख काढकाढून सुतकाचं पत्र टाकायची अगदी लगीनघाई होते. आजचा चौथा दिवस सुतकाचा! तोंच पत्र हातात! सहा दिवस आता असं रखडत कुडकुडत पडायचं! साधा मेल्यांनो काय गेल्या जन्माचं वैर होतं ते! अगबाई, चुलीवरची डाळ करपू लागली! उतरायची तरी कुणी ती आता? भिकी पण अजून येईना शाळेतून!''

अनुकाकू अशा जळफळत ठिकच्या ठिकाणी उभ्या होत्या तोवर विष्णुपंत ते पत्र सावकाशपणे वाचीत होते, काही आठवीत होते. त्यांनी त्यांच्या स्वत:च्या सख्ख्या आजोबांनाही

पाहिले नव्हते. चुलत आजोबांच्या ब्रह्मावर्ताच्या शाखेचे नाव काय ते त्याना ठाऊक होते त्यापेक्षा काहीएक ओळख नव्हती. काही वर्षांपूर्वी असेच एकदा कुणी तिकडे वारले होते तेव्हा एकदा सुतक आले होते. कुणी मेले की जे कोणचें पिढीत एकाददुसरें पत्र येईल तेवढाच काय तो त्या दोन कुलशाखातील भाऊबंदपणाचा पत्रव्यवहार!

अनुकाकू ही एक देवलसी सोवळ्या-ओवळ्याची आवड नि विटाळ-चंडाळाचा तिटकारा असलेली सुशील बाई होती. जितकी प्रेमळ तितकीच तापट. विष्णुपंत त्या आपल्या बायकोच्या लहरीलहरीनेच घरातले व्यवहार ठेवीत. त्यांचें सोवळेंओवळें फार कडकही नसे, अगदीच सुटलेलेही नव्हते. त्यांच्या त्या पत्नीला अनुकाकूला - अलीकडे ताप येत असे, त्यामुळे त्या जास्तीच चिडचिड्या झाल्या होत्या. पण घरात मोलकरीण इत्यादी ठेवण्याची शक्तीही त्या कुटुंबास नसल्याने नि अनुकाकूंच्या सोवळ्यालाही ते परवडणारें नसल्यामुळे त्या घरचें सारें काम स्वतःच करीत; आणि त्यामुळे त्यांचा ताप अधिकच रेंगाळून प्रकृती खालावत चालली होती. हे सुतकाचं विघ्न येताच नेसलेल्या सोवळ्यासुद्धा जिकडे तिकडे त्यांना विटाळच विटाळ दिसू लागून त्या भांबावल्यासारख्या झाल्या. चुलीवरची डाळ जों जों करपत चालली तों तों त्यांची बारा वर्षाची मुलगी भिकी शाळेतून येण्यास किती उशीर करते याचा त्यांना अनावर राग येऊ लागला.

शेवटी एकदाची भिकी आली. भुकेलेली, नेहमीप्रमाणे येताच दप्तर फेकून लडिवाळपणे कुरकुरच आईजवळ गेली, 'काकू खायला दे न आधी काही!' तोंच वसकन्‌तिच्या अंगावर अनुकाकू आल्या, 'अग शिवशील! शिवशील! भिके! खा मेल्यांनो मलाच एकदाचं. हट् मागं, मी सुतकी आहे!'

बिचारी भिकी मागे हटत, हा सुतकाचा विटाळ म्हणजे काय अरिष्ट आहे काय की, अशी घाबरून पाहू लागली. ती मुलगी असल्यामुळे तिला सुतक नसते, स्वतः आंघोळून आता तिनेच काय येईल तसा सैंपाक करायचा नि सहा दिवस सुतक फिटेतो सारा पाणी-झाडलोटीसुद्धा संसार चालवावयाचा ही गोष्ट अनुकाकूंनी समजावून देताच जड पावलांनी ते बारा वर्षाचें लेकरू चुपचाप कामाला लागले. अनुकाकू एका दूरच्या कोपऱ्यात राहून भिकीला आज्ञामागून आज्ञा सोडीत नि दर पळादोनपळामागे 'अग शिवशील!' म्हणून ओरडत काम करवीत बसल्या.

प्रत्येक पावलाच्या विटाळाचे, पदार्थाच्या विटाळाचें धर्मशास्त्र स्वतंत्र - सामान्य तत्त्व, नियम असा नाही. गव्हाला विटाळ नाही, ते निवडायचे, पण कणकीला विटाळ, ती शिवायची नाही; नदीला विटाळ नाही, विहिरीला विटाळ; विहिरीतल्या बेडकांचा, माशाचा पाणी लाटतांना माळरहाटगाडग्यावर बसत्या उडत्या कावळ्याचा विटाळ नाही, माणसाचा विटाळ; कोऱ्या कपड्यांना विटाळ नाही, धुवटांना विटाळ; तेल खायचें, तूप नाही; गोमुत्र प्यायचें, गोदुग्ध नाही; उपरण्याची फेट्यासारखी टापशी बांधायची, फेटा नि पागोटें घालणे नाही; कोरड्या भुईवर सैंपाकघरात पाय पडला तरी विटाळ नाही, ओल्या भुईवर पाय पडता कामा नाही; असे पोथीतले नि पोथीबाहेरचे अनुकाकूंना रूढी म्हणून सासरी माहेरी पाठ असलेले धर्मशास्त्राचे असंख्य नियम पावलोपावली मोडताना नि पाळताना बिचाऱ्या लहानग्या भिकीला जीव नकोसा झाला! तिला सुतक नव्हते तरी काळूला होते!

काळू हा एक उपजत सुधारक होता. सहजगत्या हसत हसत भिकीला चापटी मारून जाई - काकूची दृष्टी चुकवून! पण दिवसातून चारपांच वेळा तरी काकूच्या दृष्टीस भिकी सुतकाच्या विटाळलेल्या पदार्थांना वा सुतकी काळू भिकीला गमतीने शिवताना दिसेच, की अनुकाकूंच्या शिव्याशापांच्या वर्षावात बिचाऱ्या भिकीला पहिल्याने तापावे लागून मग थंड पाण्यात सचैल आंघोळून कुडकुडावें लागे! ते दिवस कडाक्याच्या थंडीचे! पण अनुकाकूच्या सुतकशास्त्राचें विधान स्पष्ट होते. थंड पाण्याच्या स्नानानेच काय तो विटाळ जाऊ शकतो- उष्ण पाण्याने नाही! भिकी अवघी बारा वर्षांची शाळकरी पोर! ती सैंपाक ती काय करणार, मोठीं भांडीं काय उचलणार, सोवळ्यातले पाणी ते काय भरणार पण कच्चेपक्के काहीतरी शिजवून त्या कुटुंबाचा संसार तिलाच चालवावा लागला. काळूची मात्र चैन होती. अनुकाकूंना तो भांडावून सोडी. गाद्यांच्या ढिगावर मघा काळू चढला होता; अनुकाकूंनी शास्त्रार्थ सांगितला की, 'भिके, गाद्या काही धूत नसतात, त्यावर गोमूत्र शिंपडले की झाले; पण त्यांच्यातल्या चादरी तेवढ्या धुवायला काढ.' काळूचें मत की, धुवायच्या तर गाद्याही धू, नाहीतर चादरीवरही गोमूत्र शिंपडले की विटाळ गेला पाहिजे! अनुकाकूंनी तें मत विचारात न घेता गाद्यांवर गोमूत्र शिंपडणेंच पुरें असे ठरवून त्या शुद्ध केल्या. हे पाहून काळू एका हातात गोमूत्र घेऊन गाद्यांच्या ढिगावर जाऊन पुन्हा पुन्हा नाचे! अनुकाकू ओरडत धावल्या की, हातातील गोमूत्र शिंपडून म्हणे, 'बघ गेला त्यांचा विटाळ! अगदी तुझं शास्त्र पाळतो बरं!' अशा वेळी मात्र काळूला दोनचार चापट्या खाव्या लागत. तेव्हा कोणच्या तरी पोथीत सुतकामध्ये चापट्या मारु नयेत असाही नियम लिहिला असता तर त्यात काहीतरी अर्थ असता असे काळूला वाटल्यावाचून राहत नसे.

सुतकामध्ये साखर खाऊ नये हा नियम मात्र अनुकाकूंनी एका प्रकरणापुरता कलिवर्ज्यात काढला होता. त्या म्हणत, चहात साखर खायला हरकत नाही; नुसती साखर खाऊ नये. काळूचें मत अर्थातच असे पडे की, दोन्ही प्रकरणी साखर खावी किंवा खाऊ तरी नये. अनुकाकू आपल्या तत्त्वाप्रमाणे सुतकात चहा पीत. काळू आपल्या तत्त्वाप्रमाणे चहाच्या वेळी उघडपणे काकूसमोर नि नुसती साखर गुपचूपपणे काकूच्या आड भिकीला पाणी भरण्यास साह्राय्य देऊन त्याचें मूल्य म्हणून घेई नि खाई.

विष्णुपंत एक शांत स्वभावाचे, आपल्या बाहेरच्या कामात गढलेले, नि घर अनुकाकूंच्या हाती देऊन टाकलेले बापडे माणूस. ते अनुकाकूंच्या तत्त्वाप्रमाणे अनुकाकूंस वागू देत, भिकीच्या तत्त्वाप्रमाणे भिकीला, काळूच्या तत्त्वाप्रमाणे काळूला. आपण स्वतः घरी अनुकाकूंच्या कलाप्रमाणे नि बाहेर त्यांचे मित्र डॉ. पुरंदरे यांच्या कलाप्रमाणे वागत.

त्याच डॉ. पुरंदऱ्यांकडे आज विष्णुपंतांना जाणें अवश्यही झाले. ती थंड पाण्याचीं स्नानें, ती झाडलोट, पाटपाणी, चूलपोतेरें नि दोन सांजा सैंपाक ही सारी खटपट त्या बारा वर्षांच्या भिकीला न झेपल्यामुळे तिला तिसऱ्या दिवशी ताप भरला. इकडे अनुकाकूंच्या अंगी तर आधीच मुरलेला. त्यात चटईवर थंडीत निजणें, गार पाण्याने आंघोळणें, भिकीचें कच्चेपक्के जेवण खाणे, पथ्य ते सोडून जे कुपथ्य तोच सुतकातला धर्म! त्यापायी अनुकाकूंचा तापही बळावला! अंगाला सारखी ठणक. पण सुतकात गादी न घेता चटईवर पडून दिवसरात्र कण्हत राहिल्या. घरात ही दुर्दशा पाहून कामकाज संपल्यावर तिसऱ्या दिवशी संध्याकाळी विष्णुपंत नोकरीवरून आले तेव्हापासून त्यांच्या ओळखीचे नि विश्वासाचे जे एकच गृहस्थ होते त्या डॉ.

पुरंदऱ्यांकडे काही औषध मागावयास नि थोड्या गप्पाही छाटावयास गेले. सुतकापायी घरी किती अडचण आली आहे ते विष्णुपंतांनी सांगितल्यावर डॉ. पुरंदरे तिथे बसलेल्या आपल्या दोघा स्नेह्यांकडे वळून म्हणाले,

'पाहिलंत ना? ही सुतकाची आजची रूढी किती अर्थशून्य नि त्रासदायक झालेली आहे ती? काय गोपूशास्त्री, सुतकात साखर खाऊ नये, गादीवर निजू नये, घराबाहेर पडू नये, थंडी असो नसो गार पाण्यानंच आंघोळावं, कपड्यांचे ढीग स्वच्छ असले तरी बोट लागलं म्हणून धुवावे आणि एका मनुष्याचा जीव गेला म्हणून दहा जिवंत माणसांना जीव नकोसा करावा, हा काय धर्म म्हणावयाचा? ज्या रूढीच्या योगे लवलेश सामाजिक असा लाभ न होता मनुष्यमात्रास निष्कारण त्रासच त्रास होतो, तो अधर्म होय!- ही सुतकाची रूढी त्यांपैकीच एक अगदी बुद्धिशुन्य भाबडटपणाची आहे.'

गोपूजशास्त्री उपाहासले, 'तर तुमचं म्हणणं काय की, आपलं प्रिय मनुष्य मेलं म्हणज दुःखी नातलगांनी बासुंदी, दूध, जिलब्या, लाडू, पेढे यथेच्छ खातपीत गाद्यागिरद्यांवर लोळावं? अहो, ज्याचा कोणी प्रियजन मरतो त्याला साखरच सोमलासारखी लागले, हसूं येताच नाही, सुखोपभोग विषवत् होतात! ह्यालाच आम्ही माणुसकी वा मनुष्यधर्म म्हणतो! तिलाच सुतकाची रूढी म्हणतात, 'शास्त्र म्हणतात!'

डॉ. पुरंदरे हसले, 'अहो इथेच तर मेख आहे. दुःख मानण्याचं शास्त्र - दुःख मानण्याची रूढी, या दोन परस्परविरुद्ध शब्दांत सुतकाच्या आजच्या ढोंगधत्तुयाचं तुम्ही, मला केव्हाही करता आलं नसतं असं, विडंबन केलं आहात!'

'डॉ. पुरंदऱ्यांच्या म्हणण्याचा प्रत्यक्ष पुरावा हवा असल्यास आमच्या राणी महाशय नि युवराज काळू यांचीच साक्ष काढा! सुतक आल्याचं पत्र येताच माझ्या पत्नीच्या डोळ्यांत टचकन् पाणी आलं - पण ते माझ्या चुलत आजोबांच्या शाखेतील एक म्हातारे गोत्रज मेले म्हणून दुःखाने नव्हे ! - तर ते मेल्याचं पत्र नवव्या दिवशी आमच्या हाती पडेल अशा बेतानं न टाकता आम्हांस सहा दिवस सुतकांत खितपत पडावं लागेल इतक्या लवकर त्यांनी टाकलं या रागान फणफणल्यामुळं! काय गेल्या जन्माच वैर होतं ते साधा मेल्यांनो!' हाच आमच्या तापट राणीमहाशयांचा सुतकाची बातमी कळताना टाकलेला पहिला दुःखाचा सुस्कारा! रूढी झालेलं दुःख म्हणजेच दुःखाचा मिथ्याचार! लवलेश दुःख नसताना माझी बायको स्वतः आणि लेकरू तापाने आजारी पडण्याइतका जी सुतकाची दगदग अगदी मनोभावना करते आहे ती केवळ सुतकात तसं करणं हे 'शास्त्र' आहे म्हणून!' विष्णुपंतांनीही स्वतःचा अनुभव सांगितला.

'पुन्हा अस पाहा –' डॉ. पुरंदरे शांतस्वरे म्हणाले, 'अगदी सख्खी आई वा बाप वारला तर त्याचं दुःख जस मुलांना तस मुलींनाही होतं. पण मुलींना, पोटच्या मुलींना सुतक नसतं! आई वारली तरी मुलींना साखर खायला, गाद्यांवर निजायला धर्माची आडकाठी नाही; त्यांच्या कपड्यांचा विटाळ नाही; पण पोटच्या मुलीपेक्षा त्या मृत स्त्रीचं दुःख ज्यांना शतपटीने कमीच वाटणार त्या चुलत चुलत दीर-जावा प्रभृतींना सुतक कडकपणानं पाळावं लागतं! उलटपक्षी ज्याच्याशी जन्मभर द्वेष, असाही भाऊबंद मेला की त्याचं मला सुतक; पण माझा एखादा जिवलग मित्र वा मैत्रिण वारली आणि तिच्या दुःखानं मला जरी जीवनही नीरस वाटण्याइतकं

असह्य दुःख होत असलं, तरी मला त्यांच सुतक नसतं! तेव्हा दुःख होतं म्हणून माणसं शास्त्रोक्त सुतक पाळतात किंवा आजची सुतकाची पद्धत नि त्याची ती विटाळवेडाच्या ब्यादीची साथ याचं समर्थन माणुसकीच्या समवेदनेनं होऊ शकतं ही क्लृप्ति, या दोन्हीही गोष्टी अगदी लटक्या पडतात.

'बरं, मृत व्यक्तीच्या वियोगानं हळहळून खरोखरच ज्यांना शोक धायधाय रडवीत आहे, विव्हळवीत आहे, त्यांना देखील दहा दिवस ह्या सुतकापायी आज आम्ही बळेबळे हाल अपेष्टा भोगणं जे भाग पाडतो - तो तरी धर्म म्हणता येईल का? तो निव्वळ निर्दयपणा होतो. आरोग्यशास्त्राच्या दृष्टीने तर अशा शोकविव्हल कुटुंबातील माणसांची मानसिक व्यथा बरी करावयासाठी आणि तिच्यापायी त्यांची शरीरप्रकृती ढासळून तेही रोगांना बळी पडू नयेत म्हणून त्यांना धीर देऊन सत्वस्थ सुग्रास अन्न बळेंबळें जेवावयास वेळच्या वेळी द्यावयास हवं. थंडी उन्हापासून बचाव होईल असे कपडे, असं स्नान, बाहेर हिंडण फिरणं हेच उपचार समजूत पाडून पाडून करावयास हवे. मायेच्या माणसांनी त्यांस पोटाशी घेऊन, पाठीवर हात फिरवून, आपल्या घरी आदरानं नि ममतेनं शेजारी बसवून, त्यांना काही विरंगुळा पाडला पाहिजे. पण दुःखानं त्यांचीं मनं विव्हळ नि घायाळ जेव्हा झालेलीं असतात तेव्हाच सुतकानं आपण त्यांचीं शरीरंही विव्हळ नि घायाळ करून सोडतो! एखाद्या महारोग्यासारखं 'विटाळ विटाळ' म्हणून हडहड करीत कोणी त्यांना शिवणार नाही. चटईवर निजणं, रुक्ष नी वेळीअवेळी कोणी दुसरा काय घालील ते खाणं, कामधंदा बंद, घराबाहेर पडण्याची चोरी! जी ती वस्तू मागून घेणं, ताटकळत दिवसरात्र पडणं, ह्या आजकालच्या सुतकाच्या बाष्कळ नि अर्थशून्य रूढीमुळं मन नि शरीर ह्या दोहोंनाही मनाच्या दुःखाच्या भरीस सुतकाचा कठोर त्रासही सोसावा लागून अधिकच उदास, भयाण, कंटाळवाणं वाटू लागतं. रोगापायी एकजण मेलं नि सुतकापायी दोनतीन जणांची प्रकृती बिघडून ते आजारी पडले अशीं कुटुंबें मी अनेकदा पाहतो. जेव्हा प्रियजन मेल्यामुळं जे कुटुंब खरोखरीच दुःखशोकानं विव्हळलं आहे त्यांतील लहान लेकरांपासून थोरापर्यंत सुतकाच्या त्रासानं नसती आबाळ नि विटाळापायी हडहड करणं अगदी निर्दयपणाचं नि त्यांच्या आरोग्यास घातक आहे; म्हणून सुतकाची चाल टाकाऊ. आणि ज्यांना सुतकाचं मुळी दुःखच नसतं त्यांच्याकडून सुतकाचं ढोंग करविणं हा निर्भेळ मिथ्याचार; म्हणून सुतक त्या प्रकरणीही टाकाऊ! अहो, धडधडीत भाड्याची माणसं आणून प्रेतापुढं पैसापासरीसारखे दर ठरवून ओरडत, छाती पिटीत जाण्याच्या ज्या चाली आहेत, त्या तशा सुतकधर्मास बाष्कळ म्हणू नये तर म्हणावं तरी काय? 'मोलें घातले रडाया, नाही आसू नाहीं माया' अशी ही चाल आजही शेकडो लोकात अगदी तुमच्या इकडच्या विटाळवेड्या सुतकी चालीसारखीच 'धर्म' म्हणून अक्षरशः पाळली जात आहे! सुतकात जी विटाळाची साथ घरीदारी आपणांस पछाडते - तो तर ऐक निव्वळ भ्रमिष्टपणाच नव्हे काय?''

'काय? डॉक्टर! आता मात्र तुम्ही पुरते वाहवत चालले आहा अं!' तिथे बसलेले एक समाजशास्त्रज्ञ बी.ए.(ऑनर्स) आश्चर्यून मध्येच म्हणाले, 'अहो, युरोपातील साहेबलोक देखील आमच्या सुतकातील विटाळ मानण्याच्या आचारास प्रशंसीत आहेत! मृत्यू घडतो त्या कुटुंबात नि घरात जे बिघडलेले वातावरण असते त्याचा संपर्क समाजात फैलावू नये यास्तव त्या कुटूंबास कोणी शिवू नये, त्यांनी दहा दिवस घराबाहेर पडू नये, त्यांचे कपडे धुऊन घ्यावे

इत्यादी नियम आमच्या त्रिकालदर्शी पूर्वजांनी घातले आहेत महाराज, आहात कुठं? अहो, गोपूशास्त्र्यांचें ते शास्त्रोक्त राहो, पण शहाणे साहेब लोकसुद्धा प्लेगामध्ये क्वारंटाईन सेग्रिगेशन प्रभृती जे उपाय योजितात, तेदेखील आमच्या सुतकातील रूढीपासून सुचले बरं का त्यांना? सुतक दहा दिवस स्मृती म्हणते, ते एकवेळ खोटं म्हणाल पण क्यारन्टाईनदेखील दहाच दिवस; साहेब लोकांनी पाळावयाचं ठरविलं ते खोटं म्हणायची कोणाची छाती आहे? साहेबदेखील सुतकाचं समर्थन करतात, समजलात! समाजशास्त्राचा प्रश्न आहे हा! चेष्टा नाही!'

'हो, हो, हो! प्रोफेसर महाशय, खरं सांगू का, जुन्या रूढीच समर्थणारं ते 'शास्त्रोक्त' एक वेळ काहीतरी समंजसपणाचं असतं; पण हे तुमचं 'साहेबोक्त त्या रूढीचं असह्य विडंबन करून सोडतं. म्हणे साहेबदेखील सुतकास समर्थितात! साहेबांत कोणी मूर्ख नसतात की काय? मेयोदेखील एक साहेबच आहे! तिची निंदा साहेबोक्त असली तरी जशी कपटी, तशीच काही साहेबांनी आपल्या वेडगळ रूढींची केलेली स्तुतीही कपटी असते. आम्ही वेडेचार सोडू नयेत म्हणूनच काही हितशत्रू साहेब त्यांना वाखाणतात. आपण साहेबोक्त झालं तरी परीक्षून घ्यावं. पोथीनिष्ठ सुतकाचा विटाळ कुठं, नि क्वारंटाईन सेग्रिगेशन उपयोगी, पण कोणचाही मृत्यू साप डसून, खड्डयात पडून, मोटार अपघातात झाला तरी सुतकाचा विटाळ धरतात. पुन्हा अगदी प्लेगनं, महामारीनं घरात बाप मेला तरी मुलांना सुतक - पण बापाच्या उशाशी बसलेल्या मुलींना नाही! विष्णुपंतांचा कोणीतरी आप्त मेला ब्रह्मावर्ताला - नि विटाळ विष्णुपंतांच्या नि त्यांच्या गोत्रजांच्या कुटुंबांस पाळावा लागतो पुण्याला - मद्रासला - सिंधला - विलायतेला! आप्त मेल्याचं पत्र गोत्रजांतच तेवढ साथ पसरवीत जातं! ती पोचताच दूरदेशी केवळ त्या ठराविक नात्याच्या माणसांत तेवढे रोगाणू सळसळू लागावे नि त्याचा घरी तेच जलवायु सेवणाऱ्या इतर, राहत्या माणसांना मात्र त्यांनी बाधू नये? हे काय वैद्यक की वेड? सुतक येईल त्या घरी मृत्यू घडो न घडो, त्या माणसांनी म्हणे घराबाहेर पडू नये. पण गावच्या वाटेल त्या माणसानं त्यांच्या घरी सरसहा येत-जात, खात-पीत राहावं हे सुतकाचं शास्त्र; हे काय सेग्रिगेशनचं तत्त्व? प्लेगची साथ काय घरचा मनुष्य बाहेर गेला म्हणजे तेवढी पाळीव कुत्रीसारखी त्याच्याबरोबर जाते, पण बाहेरचीं माणसं घरी आलीं तर त्यांच्या मागं जात नाही, त्यांना चावीत नाही? भयंकर साथीतही सुतकाचा तोच ठराविक खाक्या! दहाव्या दिवशी गोमूत्र थोडंफार शिंपडलं की 'शुद्ध' झालं घर, कपडे, माणसं, सगळं! पण याला का 'डिसइन्फेक्शन' म्हणायचं? कौलारं उलथून, कडक जंतुघ्ने फवारुन, औषधीय धुरांनी कपडेलत्ते, वस्तू वाफाळून ज्या साथीला आवरता येत नाही, ती काय घरातल्या वाटेवर चार थेंब गोमूत्र शिंपडून पळविता येते? 'विटाळ' म्हटला की, ही धर्मभोळेपणावर आधारलेली भावना; डिसइन्फेक्शन - क्वारंटाईन प्रभृती 'निरोगीकरणा' ची साधनं वैद्यकाचें प्रयोगसिद्ध उपाय! सुतकाच्या चालीशी वैद्यकीय हेतूंचा मूळ संबंध असा नाहीच! मूलतः ती चाल धार्मिक, परलोकल्पनामूलक!'

विष्णुपंत- हेच कारण माझ्या ध्यान्यात आलं हेतं बरं का डॉक्टर, जेव्हा मी इजिप्त प्रभृती देशांतील 'मर्मी'ची नि 'पिरामिडस'ची माहिती प्रथम वाचली तेव्हा अं! मेलेला राजा वा रंक परलोकात जाताच इथला संसार असाच पुढं थाटतो ही पूर्वीची धार्मिक समज असं म्हणूनच मनुष्य मरताच त्याच्या थडग्यात ताटवाटी, कपडे, दिवे, पलंग ज्याची जशी शक्ती तसं पुरीत, परगावी बिऱ्हाड करताना जसं आपण निवडक सामान बरोबर देतो.

डॉ. पुरंदरे - घरगुती सामान नव्हे तर माणसंही! पूर्वकाली कोणी मेला की त्याच्या थडग्यात त्याच्या गुलामांनाही जिवंत पुरीत. थोर राजे असले तर त्यांच्या आवडत्या बायकांनाही जिवंत पुरीत! जपानसारख्या देशात सम्राट मरताच त्याचा सेनपती, प्रधान, मंत्री अजूनही जो क्वचित् 'हाराकारी' (स्वत:च भोसकून घेऊन प्राणार्पण) करतो तीदेखील अतिप्राचीन अशा ह्याच सुतकी भावनेची उरलेली स्मृती होय. पूर्वी असं मंत्रिमंडळदेखील राजाबरोबर परलोकी धाडीत ! आमच्यात प्रेताबरोबर सती जाणारी पतिव्रताही परलोकी पतीच्या संसारात गृहिणीची तूट पडू नये याच मूळ भावनेची 'उदात्तीभूत (Sublimated) साक्ष होय. जी प्रेमविव्हल होऊन प्रियसाठी प्राणार्पण करी, तिची गोष्ट न्यारी; तसं प्राणार्पण आई आवडत्या लेकराच्या वियोगानं, वीर कीर्तीसाठी, हुतात्मे ध्येयासाठी करतात! ते निराळं. पण सुतकातील 'कर्तव्य,' 'शास्त्र' रूढी म्हणून ज्या स्त्रियांना सती जावं लागे, मृताला थंडीत उपयोगी पडेल म्हणून घोंगडी, टेकावयास काठी, दुधास गाय जी भटास द्यावी लागते, ती ह्याच भावनेचा अवशेष! त्या काळी सायकली नव्हत्या, नाहीतर मृतास परलोकीच्या सडकांवरून झटपट जाता यावं यास्तव भटास एकेक सायकल द्यावी असंही वचन गरुडपुराणातील सुतकशास्त्रात सहज सापडू शकतं! मुसलमान ख्रिश्चनांचे सुतकी आचारही त्याच आदिमानवांच्या धर्ममतांचे अवशेष, त्यांचीं थडगीं पिरामिडस्‌ची अगदी औरस संतती! थडग्यात कृमिकीटकांनी रक्तमांसहृदय भक्षिलं तरीही अस्थिपंजर जे उरतात, त्यांत जगाच्या शेवटच्या दिवशी श्वास फुंकून ईश्वर सर्वांना पुन्हा जिवविणार नि त्यांचा न्याय होणार ही मूळ भावना! सारांश की मनुष्यजातीत जे सुतकीय आचार आज शास्त्र म्हणून रूढ आहेत, त्यांच्या बुडाशी वैद्यकीय वा वैज्ञानिक अशी कोणचीही कसोटी नसून ते मुख्यत: पारलौकिक नि जुनाट अशा धर्मकल्पनांचे भाबडे अवशेष आहेत. पूर्वीच्या ज्ञानाच्या नि अज्ञानाच्या मानानं पूर्वी ते शोभून गेले असं समजून तो प्रश्न टाळला, तरीही आता यापुढं तरी आपले सुतकाचे आचार आजच्या विज्ञानाच्या नि वैद्यकाच्या कसोटीस लावून, समाजहितार्थ उपयुक्त ठरतील तसेच नि तेच काय ते ठेवावेत. हे विटाळवेड तर तत्काळ सोडून द्यावं.

विष्णुपंत - पण मृताच्या स्मृतिप्रीत्यर्थ एक सामाजिक संस्कार म्हणून तरी सुतक हवं, नव्हे काय?

डॉ. पुरंदरे - अवश्य. तेवढाच त्याचा उपयोग. पूर्वी राजा प्रभृती काहीजण मेले म्हणजे वर्षसहा महिने सुतक असे. सुतकाच्या अशा चाली समाजव्यवहारात अत्यंत त्रासदायक होतील, हे स्पष्टपणानं सांगून कित्येक स्मृतीतून राजा, मंत्री, सैनिक, शिल्पी प्रभृतीना 'सद्य:शौचा: प्रकिर्तिता:' म्हणून वगळून समाजाचीं कामे बंद न व्हावीत अशी सोय केली, लांब सुतकंही बंद केलीं. तीच विचारसरणी पुढं चालवून आता आपण बाकीच्या विटाळादी चालीही सोडाव्या. ज्यायोगे मृताच्या शोकानं विव्हळलेल्या कुटुंबीयांचं आरोग्य बिघडणार नाही, त्यांच्या हळुवार मनास विरंगुळा पडेल, मुलांलेकरांचे हाल होणार नाहीत, अशी त्यांची शुश्रूषा आप्तेष्टांनी ठेवावी. वैद्यकीयदृष्ट्या अवश्य तितकी साफसफाई, जंतुघ्न निरोगीकरण प्रभृती उपययांनी गृहशुद्धि वा मनुष्यशुद्धि व्हावी. तो प्रश्न डॉक्टरवैद्यांचा. भटाभिक्षुकांचा नव्हे. जो मृत त्याची साधार कुळकथा नि नातं ही कुटुंब एकत्र जमवून सांगावी, त्याचे गुण गावे, त्याच्या नावे यथाशक्ती काही रक्कम एखाद्या समाजहितकारक संस्थेत वा सुयोग्य नि सत्पात्र अशा विद्वानास वा विद्यार्थ्यास

दान द्यावी. समाजीय प्रदर्शनार्थ सुतकाचं निदर्शक म्हणून एखादं त्रासदायक नसलेलं बाह्य चिन्ह दहा दिवस कुटुंबियांनी वा दुःखितांनी वापरावं. थोडक्यात म्हणजे सार्वजनिक मनुष्य मेला असता आज सार्वजनिक सुतकं आपण जशी केवळ दुःखप्रदर्शक, स्मृतिमूलक नि कृतज्ञताव्यंजक अशा जनिक (Public) हेतूनंच नि पद्धीनंच काय ती पाळतो तशीच कौटुंबिक सुतकंही पाळावीं.

विष्णुपंत - अहो, पण हे तत्त्वज्ञान आता आमच्या घरापुरतं कसं व्यवहारवायचं? आम्ही आता विटाळवेड सोडलं बघा; पण आमच्या सौभाग्यवती त्या तापात तशाच चरफडत राहतील, प्राण सोडतील, पण त्या सुतक पाळण्यात अगदी सुतळीचा फरक पडू देणार नाहीत!

डॉ. पुरंदरे - एकंदरीतच तसं. बायकांचा छळ करणाऱ्या रूढी मोडण्यातही खरी अडचण बहुधा बायकांचीच येते. सुधारणांना नाक मुरडण्याकरिताच देवानं आपलं नाक वर केलं असावं अशी बहुतेक स्त्रियांची समज दिसते. बरं आज हीं दोन औषधं तेवढी तुमच्या कुटुंबाला नि मुलीला द्या, उद्या मी येतो नि स्वतः प्रकृती पाहतो.

दुसऱ्या दिवशी डॉ. पुरंदरे विष्णुपंतांच्या घरी जाऊन पाहतात तो अनुकाकूंचा ताप भलत्याच थरास चाललेला. छातीत कळ मारीत आहे. त्यांना नळी लावू परीक्षावयास डॉक्टर जाऊ लागले तो अनुकाकूंनी शिवू देण्याचें नाकारले. चटई-चवघडीचीं टोके आखडून आवरून ‘कूर्मोङ्गानीव सर्वशः’ अशा त्या हटून बसल्या. डॉक्टर म्हणाले, ‘अहो, मला विटाळ होईल, तुम्हांला नाही ना?’ अनुकाकू म्हणाल्या, ‘म्हणूनच मी शिवू देणार नाही. कारण तुम्ही स्वतः आंघोळणार नाही नि गावभर विटाळ कालवाल!’

भिकीही तापाने फणफणतच होती. आता दहावा दिवस उजाडतो केव्हा असे विष्णुपंतास होऊन गेले. काय उपचार ते अनुकाकूला त्यानंतरच करता येणार. अशक्त, उठवेना! पण ती तशीच उठून सारी आन्हिके करी. शेवटी चक्कर आली. रात्री एक वातासारखा झटका! पण तोच पाहाटे एकदाचा दहावा दिवस उगवला. त्यासरशी त्या दुःस्थितीतही अनुकाकू अगदी फुटते न फुटते तोंच उठली, आपले अंथरूण पांघरूण खाकोटीस मारले, आणि दिसू लागल्यावर कुणी आपणास घरी थंड पाण्याने न्हाऊधुऊ देणार नाही, सारा विटाळ कालवतील या भयाने तशा पाहाटेस जावयास निघाली - गावच्या नदीवर!

तिथून तिला परत घरी जेव्हा आणली तेव्हा उचलून आणली! डॉक्टरांनी औषधपाण्याची पराकाष्ठा केली; पण वाताचा झटका उतरेना. कोणी दिसलें की, अनुकाकू बेफामपणे किंचाळे, ‘अरे दूर! शिवशील! सुतक!’

पहिल्या सुतकाच्या बाराव्या दिवशी अनुकाकू वारली नि विष्णुपंतास दुसरें नि खरेखरें सुतक आले. दुःखाचीं नि दुर्दशेची त्यांच्या घरावर खरीखुरी सुतकी छाया पडली. पण त्यांना नि त्यांच्या दोन्ही लेकरांना डॉ. पुरंदऱ्यांनी आपल्या घरी आणून पहिल्या दिवसापासून कोणचीही विटाळ-फिटाळ हडहड न करता आपल्या कुटुंबात बरोबरीने सांत्वन-सांभाळ केला म्हणून निभावलें.

***

## २.१० व्रते आणि वैकल्यें

आपणां हिंदूंतच नव्हेत तर धर्मभोळेपणाच्या आहारी गेलेल्या मुसलमान-बुद्ध-ख्रिस्तीप्रभृती साऱ्या 'पोथीनिष्ठ', 'किताबी' समाजामध्ये व्रतवैकल्यविधींचें थोतांड इतके माजलेले आहे, की त्यामुळे त्या त्या समाजात विज्ञानाचा फैलाव होण्यास मोठा अडथळा येतो. ज्ञानाची प्रगती खुंटते. पंगूची बुद्धी पंगू राहते. युरोपियन राष्ट्रें तेवढीं त्या धर्मभोळेपणापासून आज पुष्कळ अंशाने मुक्त झालीं आहेत, विज्ञाननिष्ठ बनलीं आहेत. अशी विज्ञाननिष्ठ प्रगतीपर व्रते कोणचीं नि अज्ञाननिष्ठ कोणचीं ही चर्चा, विशेषतः आपणा हिंदुंपुरती या लेखात करू.

व्रतविधींचा हेतू धार्मिक दृष्टीनेही दोन प्रकारचा असतो. एक देवाची आराधना आणि दुसरा काम्यफलाची प्राप्ति. प्राप्ति वैयक्तिक नि सांघिक अशी उभयविध असते.

या दोन उद्देशांपैकी देवाची आराधना ही देवाच्या अनेक प्रतीकांची - अश्वत्थ, गोमाता, श्रीगौरी, गणपती, तुळस, म्हसोबा, बहिरोबाप्रभृती नाना रूपांची जरी असली, तरी देव एकच असल्याने 'आकाशात्पतितं तोयं यथा गच्छति सागरं! सर्वदेवनमस्कारः केशवं प्रतिगच्छती!!' या शास्त्रोक्त न्यायानेही त्या भगवानासच पावते आणि तोच संतुष्ट होऊन तीं तीं काम्यफले आपणांस त्या व्रतवैकल्यांचा परिणाम म्हणून देतो. तेव्हा व्रतवैकल्यें वरवर जरी नाना देवतांप्रीत्यर्थ केलेलीं असलीं तरी तत्त्वतः ती एकाच भगवानाच्या संतोषार्थ केलेलीं असतात. सर्व यज्ञतपोदानांचा भोक्ता नि सर्व काम्याकाम्य फलांचा दाता ती ती प्रतीके नसून ज्याचीं ती प्रतीके आहेत तो भगवान होय, हे तत्त्व श्रीभगवद्‌गीतेसारख्या तत्त्वज्ञानमय महान् ग्रंथापासून तो व्रतखंडासारख्या आचारग्रंथापर्यंत सर्वांनाच मान्य आहे. व्रतवैकल्याची ही आस्तिक दृष्टीनेही सर्वमान्य असलेली उपपत्ती आहे तशीच स्वीकारली, तरीदेखील जे जे व्रत त्या नारायणास संतोषवील ते ते पारमार्थिक दृष्टीस विश्वसनीय मानणाऱ्या श्रुतिस्मृतिपुराणोक्त श्रद्धेलाही, आपापली इष्ट फलप्राप्ती करून देण्यास समर्थ आहे अशी निष्ठा बाळगण्यास मुळीच हरकत नाही.

### २.१०.१ नारायणाचें खरें प्रतीक म्हणजे नरच होय

आणि नारायणास नराच्या सेवेहून अधिक संतोष देणारें साधन दूसऱ्या कोणत्या प्रतीकाच्या सेवेत असू शकणार आहे? वडाची पूजा करण्याने जर देव पावतो; गाईची वा बैलाची पूजा केल्याने जर देव पावतो; सापाला दूध पाजल्याने जर तो देव पावतो तर अनाथ अर्भकास वाटेवर टाकून दिलेले पाहून त्यास दूध पाजण्याने तो देव काय पावणार नाही? जे का रंजले गांजले, त्यासी म्हणे जो आपुले, त्याचें ते परोपकारी मनुष्यसेवेचें पवित्र व्रत काय त्या देवास संतोषविणार नाही? तान्हेल्याला पाणी, तापलेल्या छाया, न जाणत्याला ज्ञानदान, मरणाऱ्याला प्राणदान हीं पुण्यकृत्यें करण्याचें व्रत हे काय व्रतच नव्हे? श्रुतिस्मृतिपुराणोक्त धार्मिक दृष्टीनेही ह्या मनुष्यसेवेलाच देवास संतुष्टविणारें महाव्रत मानले नसते तर पाणपोयी घालणें, वाटेने वृक्ष लावणें, कथाकीर्तनें करणें, अतिथीस अन्न देणे प्रभृती अनेक दानांस नि आचारास पुण्यप्रद गणले असते काय? पण हिंदू, मुसलमान, ख्रिस्ती, यहुदी, पारशीप्रभृती झाडून साऱ्या धर्मांतून हीं कृत्यें पुण्यकृत्येच समजलेलीं आहेत. झाडात, पशूत, सापात, दगडात, मातीतही जर देव आहे- जर ती दगडमातीही त्याचीं प्रतीके होऊ शकतात, तर त्या देवाच्या जडसृष्टीचाच नव्हे,

तर चित्शक्तीचाही ज्यास शास्त्रेंच परमव्यक्त अंश मानतात, तो मनुष्य त्या देवांचे सर्वोच्च प्रतीक मानावयास नको काय? नारायणाचा परमव्यक्त अंश, चिन्मय मूर्ती जर कोणची असेल तर तो नरच होय असेच शास्त्रें म्हणतात आणि म्हणूनच त्या नराची सेवा इतर कोणच्याही प्रतीकाच्या सेवेहून नारायणास अधिक संतोषविणारी असलीच पाहिजे. त्या इतर प्रतीकांच्या सेवेने जे जे ऐहिक काम्यफल मिळते किंवा पारलौकिक पुण्य लागते म्हणून पोथीत सांगितले आहे ते जर खरें असेल, तर हेही खरें असलेच पाहिजे की ते ते ऐहिक वा पारलौकिक फल मनुष्याच्या सेवेने, परोपकारव्रताने इतर कोणच्याही व्रतापेक्षा अधिक निश्चिततेने व्रत करणारास मिळालेच पाहिजे.

अर्थात्व्रतवैकल्याचे जे आत्मशुद्धि, काम्यफलप्राप्ति आणि पारलौकिक पुण्यप्रभृती हेतू आहेत, ते सर्व मनुष्यसेवेने, परोपकारच्या व्रताने मिळणारे असल्यामुळे आपण व्रतांची निवड करताना जर अशींच व्रते निवडलीं, की त्यांच्यामागे मनुष्यजातीचें प्रत्यक्षपणे काही ना काहीतरी हितच साधेल. आपल्या समाजाची वा राष्ट्राची काही ना काहीतरी हेचि देही हेचि डोळा फळ देणारी उपयुक्त सेवा घडू शकेल आणि मनुष्याच्या अज्ञानास वा धर्मभोळेपणास उत्तेजन न देता त्याचें ज्ञान नि सुख वाढविले जाईल, तर या व्रतविधींनीच देवास संतोषविण्याचें पारलोकिक पुण्य संपासून आपले, आपल्या राष्ट्राचें आणि मानव्याचें हित साधण्याचें ऐहिक फळही येथल्या येथेच आपणांस मिळविता येईल.

व्रताने देव पावतो; परलोकीची चांगलीवाईट फळें येथल्या ऐहिक बऱ्यावाईट कृत्यांवरून मिळू शकतात; मनुष्य ज्यास बरेंवाईट म्हणतो त्यासच देवही बरेंवाईट म्हणतो अशी भावना असणाऱ्यांनाही व्रतवैकल्यांची निवड करताना वरील कसोटी उपयोगी पडावी, संमत वाटावी अशाच दृष्टीने तिला समर्थिणारा कोटिक्रम वर केलेला आहे. कारण ज्यांची निष्ठा देव, परलोक नीतिअनीति ह्यांविषयी अशी धार्मिक छापाची मुळात नाही, सृष्टीनियमांच्या अबाधित कार्यकारणभावास देवाच्या काल्पनिक प्रसन्नतेने वा रोषाने बदलून घेण्याची आशा भाबड्या माणसाचीं सुखस्वप्ने असून त्या दृष्टीने होणारीं व्रतवैकल्यें हीं मुळातच लटकी आहेत असा ज्यांचा ठाम सिद्धान्त ठरलेला आहे त्यांचा ह्याविषयी संबंध पोचत नाही. ते व्रतवैकल्ये यांच्यापलीकडे गेलेले; त्यांना व्रतांची निवड करण्याचा विवेक सांगणें मूलतःच असंबद्ध होणार.

ह्यास्तव एका बाजूस नितान्त पोथीनिष्ठा असा धर्मभोळा वर्ग सोडून नि दुसऱ्या बाजूस नितान्त विज्ञाननिष्ठ प्रत्यक्षवादी वर्ग वगळून जो मध्यम वर्ग उरतो आणि आज ज्याची संख्या भरपूर आहे त्याला उद्देशूनच व्रतांत निवड कशी करावी नि कां करावी हे वर सांगितले आहे. हा बहुसंख्याक वर्ग धार्मिक असला तरी धर्मभोळा नाही. विज्ञाननिष्ठ नसला तरी बुद्धिवादास अगदीच पारखा नाही. व्रतवैकल्याकडे त्याची प्रवृत्ती असली तरी ती व्रते अगदी वेडसर अज्ञानावर उभारलेलीं नसावीं आणि शक्य तों समाजास प्रत्यक्षपणे ऐहिक दृष्टयाही उपयोगी असावीं हे तत्त्वही तो सहसा नाकारणार नाही. तो वरील कारणांसाठी व्रतांची निवड आचरण्यास बहुधा सिद्ध होईल. वर विशदिलेल कोटिक्रमानुसार ठरणारी व्रतांची कसोटी ज्या सूत्रात थोडक्यात या लेखापुरती समारोपिता येतील ती सूत्रें हीं -

- १ -

ज्या व्रतांतील देवता आणि त्यांचीं वर्णनें आजच्या प्रयोगक्षम विज्ञानाने साफ खोटीं पडलेलीं आहेत; सृष्टीविज्ञानाच्या प्राचीन अज्ञानामुळेच ज्या घटनांना वा निर्जीव वस्तूंना सजीव देव समजले गेले, त्यांना प्रसादविण्यासाठीच जीं व्रते प्रचलविलीं गेलीं ती सर्व व्रते आज टाकाऊ मानलीं जावींत. मनुष्याच्या आजच्या वैज्ञानिक सिद्धान्ताच्या प्रसाराने जनतेस अधिक डोळस करावयाचें सोडून हीं व्रते तिला अंधळीची अंधळी ठेवू पाहतात. बुद्धीचा विकास खुंटवितात, अशीं व्रते असत्याची पूजा होत. निव्वळ मिथ्याचार होत. या वर्गाच्या व्रताचें उदाहरण हवें असले, तर आकाशस्थ ज्योतिर्गोलविषयक ग्रहणें–संक्रांत-सूर्यचंद्रपूजाप्रभृतीप्रीत्यर्थ आचरले जाणारे आमचे धर्मविधी पाहा!

- २ -

देवास प्रसन्न करण्यासाठी, आत्मशुद्धीसाठी, भूतदयेसाठी किंवा काही काम्य हेतूच्या सिद्धीस्तव केलीं जाणारीं जीं जीं व्रते असतील ती ती अचारितांना त्यांची जुनीं रूपें आज निरर्थक, भाबडीं वा लबाडीचीं दिसतील ती टाकून त्याच हेतूने, त्याच काम्यफलासाठी, तीच व्रते अशा रूपात करावीं, की ज्यायोगे त्यांच्यासाठी कराव्या लागणाऱ्या कर्मांनी आणि दानांनी आजच्या परिस्थितीत आपल्या हिंदू राष्ट्रास अत्यंत आवश्यक असलेली कोणती तरी प्रत्यक्ष हितकारक सेवा घडेल. 'ह्या दानाने वा कर्माने माझ्या राष्ट्राची काहीतरी प्रत्यक्ष सेवा घडत आहे ना?' ही कसोटी प्रत्येक व्रताच्या कर्मास वा दानास लावली की संपले. तो व्रतविधी त्या कसोटीस उतरला नाही तर तो साफ सोडून द्यावा नि त्याच काम्य वा निष्काम हेतूने हिंदू राष्ट्राची प्रत्यक्ष सेवा ज्यात घडेल अशा विधीने ते व्रत सांग करावें. नराच्या प्रत्यक्ष सेवेहून म्हणजे राष्ट्राच्या प्रत्यक्ष सेवेहून नारायणाची सेवा करण्याचें योग्यतर साधन मनुष्याच्या हाती दुसरें कोणचेंही नसल्याने शास्त्रेंही नरासच नारायणाची अवताराई विभूती मानीत असल्याने, त्या राष्ट्रसेवेने देव इतर कोणत्याही पूजनाहून अधिक संतुष्ट झालाच पाहिजे आणि ते ते काम्यफल त्या त्या सेवकाला पोचवीत असला पाहिजे. जर व्रतांची पारलौकिक वा काम्य फलश्रुती सत्य असेल तर! पण जरी क्वचित् ते पारलौकिक फल कल्पित ठरले वा निष्फळले तरीदेखील त्या व्रतार्थ केलेलीं अशीं राष्ट्रसेवेचीं कर्मे वा दिलेलीं राष्ट्रार्थ दानें ही ऐहिक दृष्टीने तरी केव्हाही निष्फळू शकणार नाहीत. कारण त्यांच्यामागे प्रत्यक्षपणे आपल्या हिंदू राष्ट्राच्या म्हणजेच हिंदू धर्माच्या हितास जे साहाय्य होईल ते ऐहिक फळ तरी पदरात पडेलच पडेल. त्या मानाने आत्मशुद्धिही होईल; सद्धर्मही घडेल.

ह्या दोन सूत्रांची कसोटी प्रत्येक व्रतास लावून दाखविणें अशा लेखात जरी असाध्य असले, तरी दिग्दर्शनापुरते कसोटीवर व्रते कशीं पारखावीं ह्याचीं काही उदाहरणें देत आहेत.

- ३ -

ज्योतिर्गोलविषयक सारी पूजाअर्चा नि व्रतवैकल्यें साफ खोटी असल्यामुळे आजच्या आज टाकून द्यावयास हवींत !

ग्रहणें - हे अशा टाकाऊ धर्मविधीचें एक उत्तम उदाहरण आहे. पूर्वी रानटी स्थितीत मनुष्याला ग्रहणाचे नियम माहीत नसत; तेव्हा आकाशात सूर्य वा चंद्र दिसता अवेळी नाहीसा होत चाललेला पाहून केवढे आश्चर्य नि भीती वाटत असेल ह्याची कल्पना आजही आपणास सहज करता येईल. आकाशात एकदम दोन सूर्य एखाद्या दिवशी दिसू लागले तर आजही ती भयविव्हल अधीरता आपल्यासही वाटल्यावाचून राहणार नाही. ऐतिहासिक काळातही रानटी लोकांच्या ह्या भयाचे अनेक पुरावे सापडतात. उदाहरणार्थ कोलंबसाविषयी आख्यायिका पाहा. अमेरिकेतील मूळवासी रानटी लोकांना ग्रहण केव्हा येते ते वर्तविता येत नसे. यास्तव ते त्यांना देवाच्या कोपाचेंच अनयिमित नि भीतिप्रद चिन्ह वाटे. कोलंबसाच्या लोकांना ग्रहणें आधी वर्तविता येत, त्यामुळे अमेरिकनांस त्यांनी भिवविले, की जर तुम्ही आम्हांस शरण न याल तर आमचा देव येत्या अमुक दिवशी अमक्या वेळी आकाशातून सूर्यासही नाहीसा करील! त्या धमकावणीप्रमाणे नक्की त्याच वेळी सूर्य नाहीसा होऊ लागला- कारण तो ग्रहणाचा दिवस होता! घाबरलेले ते मूळवासीय कोलंबसास शरण येऊन ‘देवाचा राग शांत करा!’ म्हणून प्रार्थू लागले; कोलंबसाच्या लोकांनीही उ:शाप दिला, की ‘अमक्या वेळेस सूर्य परत देऊ’ आणि बरोबर त्याच वेळी सूर्य आकाशात पुन्हा प्रकाशू लागला! ह्या साध्या भाकिताने त्या मूळवासीयांवर कोलंबसाच्या सैन्याच्या अद्भूत शक्तीचा केवढा परिणाम झाला असेल! ते अमेरिकन त्या नवागत लोकांस अजिंक्य असे ‘राक्षसदूत’ किंवा ‘देवदूत’ समजू लागल्यास त्यांत काय नवल आहे! अशा रानटी अज्ञानाच्या काळी ग्रहणासरशी भयभीत होऊन त्या ईश्वरी कोपास पुण्यकृत्यांनी शांतविण्यास्तव लोक ‘दे दान सुटे गिऱ्हाण’ म्हणून ओरडत नि दानें देत; स्नानें करीत; ते सूऱ्याचें सुतक सुटताच कपडे धुऊन, झाडून, सारवून त्या संकटाच्या विटाळातून मुक्त होत, ते साहजिकच होते, कित्येक जाती बहुधा चेटकाने आपण ग्रहण लावतो असेही भासवीत असाव्या आणि ते खरें वाटून त्यांस दान देऊन, संतोषवून ग्रहण सोडवणें इतरांस भाग पडत असावें. राहुकेतु हे दैत्य, राक्षस; त्यांचे वंशज नि सगेसोयरें म्हणजेच गावाबाहेर राहणारे ते ‘उग्र, मांग, चेटके, गारुडी, महार प्रभृती चांडालवर्ग! म्हणून बहुधा तेच ओरडत फिरण्याचीही वहिवाट पडली असावी ‘दे दान सुटे गिऱ्हाण! दान द्याल तर आमचें चेट्रक मागे घेऊन हे गिऱ्हाण आम्ही सोडवितो!’

ते काही असले तरी आज विज्ञानाने ग्रहणांचे नियम नि कारणें अशीं सुनिश्चितपणे ठरवून टाकलीं आहेत की जसें बे बे चार! तुम्ही दान द्याल तरी ते ग्रहण एक पळही आधी सुटत नाही; न दिलेत तरी एक पळही अधिक टिकत नाही. तिथे देवादानवांची कोणाचीही खरोखरी लढाई होत नाही; ती सगळी कथा सुंदर रूपक आहे. जशा हितोपदेशातील कुत्र्यामांजरांच्या कल्पित गोष्टी तसेच अगदी सर्वांशी कल्पित! त्याच्याशी देवाच्या रागलोभाचा लवलेश संबंध नाही.

आपल्या आज अगदी टाकाऊ ठरलेल्या रूढी पूर्वीच्या अज्ञानाच्या वा भिन्न परिस्थितिच्या काळात खऱ्या वा हितकारक वाटणें साहजिकच होते. हे समर्थन पुरेसें न वाटून त्याचें समर्थन

आजच्या विज्ञानाच्या दृष्टीनेही करू पाहणारा जो एक वर्ग आहे, त्याचा कोटिक्रम तर त्या रूढीस अधिकच हास्यापद करून सोडतो. कसे तर या ग्रहणांच्या प्रकरणीच पाहा! ते म्हणतील, 'अहो, ग्रहणाच्या वेळी एकंदर वातावरणांत मोठी चलबिचल होते!''बरं होते. पुढं?' 'त्याचा मनुष्याच्या शरीरावर नि पृथ्वीवरील वस्तूंवर मोठा परिणाम होतो. बरं होतो. पुढं?' 'अहो पुढं काय! म्हणूनच आमचं आरोग्य राखण्यासाठीच त्रिकालदर्शी ऋषींनी ह्या रूढी पाडल्या, की ग्रहणाच्या वेळात खाऊ नये; लोणच्याची बरणी, पापडाचे डबे, मोरावळ्याची बाटली यांवर तुळशीपत्रें ठेवावी; चांडाळ, मांग, महारांस फाटकी वस्त्रे द्यावीं, ब्राह्मणांस दानें द्यावीं; ग्रहणें लागता सुटता स्नानें करावी; गायत्री जपजाप्य यांचा धुमधडाका उडवावा!'

ग्रहणांमुळे वातावरणात हवे ते फेरफार होत असले तरी डबे, बाटल्या बरण्यांवर तुळशीपत्रें ठेवल्याने आतील लोणचीं, पापड, मोरावळे यांवरील अनिष्ट परिणाम टळतात; तेव्हा सृष्टीविज्ञानाचा नियम अजब खरा! आणि जर डब्याबरणीवर, शालीपैठणींवर तुळशीपत्रें ठेवल्याने ग्रहणाचें संकट टळते, तर त्या घरावरच तुळशीपत्रांचा बुचका टाकून मोकळें का होऊ नये? म्हणजे मग घरातील कपडे आदि पदार्थांवर प्रत्येकी तुळशीपत्र टाकणें नको. ग्रहणात जेवल्याने हिंदू लोकांचेच आरोग्य तेवढें बिघडते असे दिसतें. कारण युरोप, अमेरिका, चीन, जपान सारें जग ग्रहणातून जेवतही असते आणि जगतही असते! तिकडे कोणच्याही भयंकर साथी, - ग्रहणांत पाणी प्याल्याने, कपडे न धुतल्याने, महारांस वा ब्राह्मणांस दान न दिल्याने, जपजाप्य न केल्याने, ग्रहणानंतर पडल्याचें फारसें ऐकिवात नाही! त्यांचें वायुमान निराळें, हिंदू स्थानचें वातावरण निराळें म्हणून पुन्हा एका भौतिक विज्ञानाच्या नावे थाप ठोकाल तर तुम्हांस तीही सोय नाही. कारण आधी एकाच गावात घराला लागून असणाऱ्या घरांत नि पेठांत हिंदू, मुसलमान, ज्यू, ख्रिस्ती, पारशी जे राहतात त्यांपैकी तुळशीपत्राखालील लोणचें खाल्ले म्हणून तो जगला नि तुळशीपत्र नसलेल्या एका बरणीतले लोणचें नि ताजा भात ग्रहणांना जेवला तो तो उठतो तोंच पोट फुगून मेला असं कधीही घडत नाही!

मनुस्मृतीत निषेध आहे, की, 'नेक्षीतोद्यन्तमादित्यं स्नातं ग्रस्तं कदाचन! नोपस्पृष्ट न वारिस्थं न मध्यनभसो गतम!!!' (अ.४,३७) उगवताना, ग्रहण लागताना, खग्रास ग्रहणात, पाण्यांत वा मध्यान्ही सूर्यास मुळी पाहूच नये! आता या कोणत्याही अवस्थेत, आकाशात वा पाण्यातही जर सूर्यास पाहावयाचें नाही तर आम्ही त्यास पाहावें तरी कुठे? चित्रात की काय? सूर्याविषयीची काही, प्रकरची वैज्ञानिक माहिती त्यातला त्यात जर केव्हा उत्कृष्टपणे निरीक्षिता येत असेल तर ती त्याच्या ग्रहणाच्या वेळीच होय. एवढ्यासाठी युरोपीय ज्योतिर्विद मोठ्या प्रयासाने हजारो मैलांचा प्रवास करून सूर्यग्रहण खग्रास असेल तिथेच जातात नि अनिमेष निरीक्षण करतात; पण आमची मनुस्मृती म्हणते, खग्रास सूर्यग्रहण मुळी पाहूच नये!

ह्या सूर्यचंद्रांच्या ग्रहणाविषयी प्राचीन काळच्या अज्ञानयुगात अशा आज साफ चुकीच्या ठरलेल्या अनेक विक्षिप्त समजुती जगातील यच्चयावत् मनुष्यसमाजात प्रचलित होत्या - केवळ आपल्या हिंदूंतच नव्हेत; पण आजच्या युरोपियन समाजासारख्या विज्ञाननिष्ठ प्रगत लोकांनी त्या प्रत्यक्ष सिद्ध ज्ञानाच्या उलट आहेत असे दिसताच जशा तत्काळ सोडून दिल्या, तसेच आम्हीही आता करावयास हवें आणि ग्रहणाविषयीची वर वर्णिलेली सारी धर्मभोळी अज्ञानजन्य विधिविधानें मुळीच टाकून दिलीं पाहिजेत.

संक्रांत - जी गोष्ट ग्रहणाची तीच संक्रांतीप्रीत्यर्थ आपण करीत असलेल्या धर्मविधींची. सूर्य आणि चंद्र हे कोणी खरोखरीचे सजीव, समनस्क प्राणी असून राहुकेतू हे कोणी खरोखरीचे अक्राळविक्राळ दैत्य आहेत अशी जनतेची भाकड समजूत करून देण्यास त्या ग्रहणावरचीं कल्पित रूपके नि कथा कारण झाल्या; तशाच या सक्रांतीनिमित्त प्रतिवर्षी पंचांगात प्रसिद्ध होणारी भाकड रूपके लक्षावधी सामान्य लोकांचें त्या मकरसंक्रमणाच्या साध्या घटनेविषयीचें अज्ञान धर्माच्या नावे वाढविण्याची नि टिकविण्याची फसवेगिरी करीत आहेत! प्रत्येक ज्योतिर्गोलाच्या गतिस्थितीचा पृथ्वीवर नि मनुष्यावर परिणाम होतो हे वैज्ञानिक सत्य आहे. जसा पावसाचा, उन्हाचा, प्लेगचा तसाच तोही. पण तो परिणाम त्या संक्रान्तप्रभृती ज्योतिर्गोलांच्या नियमबद्ध गतिस्थितीस देवता कल्पून त्यांस गंधफुले वाहून वा त्याप्रीत्यर्थ मडक्यांची गाडग्यांचीं, दानें देऊन ती ती व्रते आचरण्याने टाळू शकतो असे शिकवीत घरोघर फिरणें ही मात्र निव्वळ ठकबाजी आहे. ज्योतिर्गोलांच्या गतिस्थितीचे परिणाम गणिताच्या उत्तरासारखी सुनिश्चित सृष्टीक्रमाचीं फलिते होत. ती माझ्या खेड्यातल्या कोण्या शामभटाला मी जेवायला बोलाविले वा न बोलाविले तरी घटणार कशीं! वाढणार कशीं? चारा पंचे वीस, हे उत्तर जसें मी त्या चाराला वा पाचाला संतोषविण्यासाठी गंध वाहिले; तीळ वाहिले; गाडगीं दान दिलीं, तरी वीसाचे दहा होणें नाही; तीस होणें नाही, तर ठाम विसाचे वीसच राहणारे आहे; तशीच मकरसंक्रमण, ग्रहण प्रभृती ज्योतिर्गोलांच्या स्थितिगतीची फळें,

या पंचांगावर छापलेले संक्रांतीचें विचित्र सोंग नि तिचे वेडगळ स्तोम पाहा! 'ती पक्षी जातीची आहे' आणि तरीही त्या पक्ष्याने माणसासारखा 'गोपीचंदनाचा तिलक कपाळास लावून केवड्याच्या पाकळ्या हातात वासासाठी घेतल्या आहेत!' ती येते पश्चिमेकडून, जाते पूर्वेला, पाहते आग्नेयेकडे! एकीकडे जाताना भलतीकडेच पाहात ठोकरा खाणाऱ्या आजच्या हिंदू मनोवृत्तीची ती सुयोग्य ध्येय आहे. दुसरें काय? सुदैवाने तिला तोंड एकच आहे; पण हात आठ आहेत आणि तिचे 'ओठ नि नाक लांब आहे!' मकरसंक्रमण या घटनेला नाक आहे! उद्या गुरुत्वाकर्षणाला केस आहेत नि त्याला कामिनिया तेल लावलेले आहे असे सांगून एखादे अद्ययावत्दैवत कोणी पुजू लागल्यास काही हसावयास नको! त्या अर्थाचें एक संस्कृत अनुष्टुप रचून भविष्यपुराणाच्या सतत वाढत्या अध्यायात घुसडले की आटोपले! पण या वर्षीच्या संक्रातीने केलेली एक गोष्ट मात्र अगदी योग्य आहे; ती ही, की तिचे वाहन आहे गाढव! असल्या कल्पनेला वाहून नेण्यास बैलदेखील आपल्या शहाणपणास कमीपणा आणणारें मानीत असावा यासाठीच बहुधा या विमानवाहनांच्या युगातही वाहन गाढवच पसंत केले असावें! असल्या कार्यी कार्यवाह होण्याचें शहाणपण गाढवावाचून दुसऱ्या कोणात आढळणारें आहे!

ह्या संक्रांतीच्या पर्वकालात 'गाई-म्हशीचें दूध काढू नये; गवत तोडू नये आणि दात घासू नये!' तसल्या गदळ तोंडाने त्या पूर्वीच्या स्तोत्राचे भपकारे सोडीत बसावें! आणि सगळ्यात मुख्य गोष्ट म्हणजे दानें द्यावी - ब्राह्मणांस दानें द्यावी! ती म्हणजे लोकरीचीं वस्त्रें, तूप, भूमी, गाय आणि सुवर्ण दिले, की पृथ्वी नि सूर्य ह्यांच्या त्या गतिस्थिती यथावत् होऊन मकरसंक्रमणाची सुखप्रसृती होईल. पण जर तेवढ्यात यजमानाने दात घासले किंवा बाळंभटाला तूप मिळाले नाही तर - तर काय! तर ते मकरसंक्रमण खाडकन ठेचाळीत; सूर्य, पृथ्वी, ब्रह्मांड ठिकाणच्या ठिकाणी थांबेल!

आणि 'ह्या संक्रातीच्या कृपेने पश्चिम दिशेचे लोक सुखी होतील आणि पूर्व दिशेवर तिच्या रोषाने संकटें येतील; त्या लोकांची दुर्दशा होईल!' ते ठीकच आहे! कारण पूर्व दिशेचे हे बिचारे हिंदू त्यातल्या त्यात तिची पूजाअर्चा करतात; तिचीं स्तोत्रे गातात; तिच्या नावाने दानें देतात; तिचा सारखा बडेजाव ठेवून थरथर कापत असतात म्हणून त्यांच्यावरच ती संक्रांत यावी हे साहजिकच आहे! पश्चिमेचे लोक जरी तिला दमडीचा धूपही कधी जाळीत नाहीत, तिच्या व्रतांची टर उडवून तिच्या पर्वकाळात दूध पितात, मांस खातात, दारू झोकतात, दमडीचें दान देत नाहीत, दात घासतात तरी त्याचें दात कधीच कुणी पाडीत नाही, संक्रांत पाडते दात 'पूर्वेकडच्या 'लोकांचे-म्हणजेच हिंदूंचें! कारण पश्चिमेकडे वक्र दृष्टीने पाहण्यची संक्रातीची छातीच नाही. त्या पश्चिमेच्या वाटेस जाताच गाठ पडणार मशीनगनशी, तोफांशी, बेडरांशी, बॉबशी? म्हणून आज शतकोंशतके संक्रांत त्यांचें काही एक वाकडें करीत नाही आणि शतकोंशतके ह्या हिंदुस्थानच्या उरावर जी ती बसली आहे ती उठता उठत नाही! ह्यावरून संक्रांतीस प्रसन्नविण्यासाठी म्हणून सांगितलीं जाणारीं हीं बाष्कळ व्रते नि धर्मविधी किती खुळचट नि खोटे आहेत हे उघड होत नाही काय?

तेव्हा प्राचीन युगात जितक्या क्षम्य तितक्याच या विज्ञान युगात आता अक्षम्य ठरलेल्या ह्या धर्मभोळ्या कथांना नि व्रतांना पंचांगात यापुढेही छापून अज्ञ जनतेला कोणीही फसवू नये हेच उचित नि हाच धर्म आहे. गाढवावर बसणाऱ्या त्या संक्रांतीच्या विक्षिप्त चित्रास फाटा देऊन यापुढे तरी ज्योतिषशास्त्रातील त्या संक्रमणाची अद्ययावत्सत्य ती माहिती गणितशास्त्रीय निश्चित सिद्धान्तासह प्रत्येक पंचागात छापावी. तो मकरसंक्रमणाचा खरा भौतिक अर्थ घरोघर शिष्टांनी वाचून दाखवावा आणि अज्ञांस विज्ञ करण्याचें पुण्य पदरी बांधावे. संक्रांतीस प्रसन्नविण्यास ही भाबडीं व्रते नि विधी पार झुगारून देऊन त्या सणास, इष्टमित्रांस 'तिळगूळ घ्या गोड बोला' ही प्रेमळ विनंती करीत हलवा देण्याचा त्या हलव्याइतकाच स्निग्ध तो मधुर प्रघात काय तो चालू ठेवावा. त्या सणास 'सार्वजनिक तिळगुळा'चे समारंभ करण्याचा पडत असलेला प्रघातही समाजसंघटनेच्या दृष्टीने फारच चांगला आहे.

### २.१०.२ शनिप्रभृती ग्रहोपग्रह

ह्यांची माजलेलीं स्तोमेंही आज तशींच वायफळ राहणें हा तर निव्वळ अंधळेपणा आहेच. पण त्याहूनही अंधळा नि अगदी हास्यास्पद धर्मभोळेपणा हा, की तो शनी नि मंगळ पृथ्वीवरल्या एखाद्या दगडास शेंदूर लावून नि तेल ओतून शनिमाहात्म्याची पोथी वाचली वा कोण्या गोम्यासोम्यास दोन मुठी तांदुळ दिले की प्रसादतो नि न दिले की तो रागावतो असा उपदेश देत सुटावें! कसला शनी नि कसले शनिमाहात्म्य! अहो, या ब्रह्मांडाच्या विस्तींण म्युनिसिपालिटीने आकाशप्रांगणशत सृष्टीनियमांनुसार लावलेले हे सारे कंदील आहेत. त्या कंदिलात ठराविक तेजाचें घासलेट घातलेले आहे, तोंवर तुम्ही त्यांस लाखों शिव्या देत राहिलेत तरी ते जळल्यावाचून राहणार नाहीत. तें तेजाचें घासलेट जळत असता ठराविक चटके - तुम्ही या दगडास तेलाचीं नि शेंदुराचीं कितीही पुटें चढविलींत तरी प्रसादून देण्याचें सोडणार नाहीत आणि ते घासलेट संपले की तुम्ही कितीही काकुळतीने प्रर्थिले तरी विझल्यावाचून राहणार नाहीत. शनी जर शनिमाहात्म्याच्या भाकड पोथीने प्रसन्न होतो तर या लाकडी खांबावर

लावलेल्या या गावातील सडकेवरचा हा घासलेटी कंदीलही कोण्या कंदील माहात्म्याने का प्रसादू नये? - घासलेटावाचून जळू नये? शनिमाहात्म्याप्रमाणे कंदीलमाहात्म्य रचून शनवारचा उपास करून, पाट मांडून या समोरच्या कंदिलाप्रीत्यर्थ भक्तिपूर्वक जर ती पोथी आम्ही वाचू लागलो, की-

ओम्जयजयाजी कंदिला

म्यूनिसिपल यशोमंदिला

काळोखासुराच्या धुंदीला

उतरविता तू तत्क्षणी !!१!!

राकेल डबा ज्याचा पिता

आगपेटी धन्य माता

हे कंदिलदेवा समर्था

दीपोज्योतिर्नमोस्तु ते !!२!!

हा कंदिलवाला नौकर

तुझिया डब्यात राकेल

घाली थोडें चोरी फार!

काळोख्याचि रात्रीं नेमाने !!३!!

यास्तव करी मी नवस

मावळता दिवस

मालवे न तू! परी प्रकाश

घासलेटावाचोनी !!४!!

ओम्जयजयाजी कंदिला! म्युनिसिपल यशोमंदिला-

पावसी जरी या नवसास

ब्राह्मण घालीन दहावीस

लागू दे निदानीं न ठोकरीस

आम्हां तुझ्याची खांबाच्या !!५!!

तर अशा कंदीलमाहात्म्याने जसा हा कंदील घासलेटावाचून प्रकाशणार नाही तसाच तो शनी - तो आकाशभर पेटलेला आगीचा एक डोंबाळा!

२.१०.३ तसेच हे सूर्य आणि चंद्र!

हा दिवसाचा सम्राट् नि तो रजनीचा कान्त पाहा! हे अन्न, हे जल, हे सुगंध, हे सुरंग, ही उष्णता नि हे जीवन, विशेषतः ज्याच्या अस्तित्वामुळेच प्रकर्षेकरून प्रणिमात्रास ह्या भूमंडलावर लाभू शकत आहे त्या सूर्याचे उपकार कुठवर वर्णावे! त्याचें ते दिव्य, हिरण्यमय, दैदीप्यमान तेजोमंडल पाहताच मनुष्याचे नेत्रच नव्हेत, तर बुद्धीही दिपून जाते! त्या महनीय विभूतिमत्त्वाने आदर नि त्या अत्यंत उपकारिकत्वाने कृतज्ञता यांही भरून जाऊन त्या भगवान् अंशुमालीस त्या वेदकालीन रसिक ऋषींनाच काय; पण आजच्या एखाद्या रखरखीत नास्तिकालाही वारंवार वंदिल्यावाचून राहवणार नाही! आणि त्याचप्रमाणे जेव्हा 'ततः कुमुदनाथेन कामिनीगण्डना! नेत्रानंदेन चंद्रेण माहेद्री दिगलंकृता' होऊन शोभू लागते तेव्हा त्या पूर्णचंद्राच्या दर्शनासरशी समुद्राचें खारें पाणीदेखील जिथे उद्वेलित होते, तिथे हृदयाचें सारे रस उल्लसू लागतात यात काय नवल! प्रेमाने आणि आदराने भारून गेलेले मन क्षणभर सजीव नि निर्जीव सृष्टीचा विलगपणा विसरून त्या तेजोद्वयास आज युगानुयुगें जे पुजू जात आहे, भजू पाहत आहे ते अगदी साहजिकच आहे!

परंतु शिवरायांचा पुतळा पाहून आपण आदराने अवनतमस्तक होऊन त्यास जों प्रमाणात करतो नि पुष्पगुच्छ वाहतो ते निराळें नि त्या पुतळ्यास जिवंत शिवाजीच मानून त्याने प्रसादावें म्हणून उपास करणें, त्याचे पाय रगडणें, त्याला खरा घोडा देऊन त्यावर चढ म्हणून आग्रह करणें नि तशा व्रताने तो पुतळा त्या घोड्यावर बसून हा हिंदुस्थान देश स्वतंत्र करण्यास पुन्हा निघणार म्हणून अपेक्षा करणें हे निराळें! तसेच सूर्यचंद्रांच्या दर्शनासरशी आदर नि प्रेम उत्पन्न होणें निराळे आणि त्यांस सजीव देवता मानून आपणांस इष्ट फले आपण त्यांची स्तुती केल्याने वा अर्घ्य दिल्याने वा बारा सूर्यनमस्कार घातल्याने देतात नि तसे न केले तर रागावून आपली हानी करतात असे विश्वसणें हे निराळें! पुन्हा असे पाहा की-

२.१०.४ जसा प्राणदायक तसाच प्राणहारकही आहे हा सूर्यच!

थंडीने गारठलेल्या मनुष्याला सूर्याचे किरण प्राणदायक भासतात; पण त्याच किरणांची प्रमाणाबाहेर झळ लागताच माणूस पटकन् मरून पडतो! सूर्यशनींना प्रसादविण्याचें व्रत करा वा करू नका; उष्णतेचे जे ठराविक परिणाम मनुष्य जगवावयास वा मारावयास कारण होतात, ते काही केल्या व्रतांमुळे, सूर्याच्या रागामुळे वा लोभामुळे बदलू शकत नाहीत. मनुष्यजगाच्या प्रभावाला कारणीभूत होणारा हा सूर्यच त्याच्या प्रळयाचेंही कारण होणारा आहे - झालेला आहे! मनुष्यजगताच्या अज्ञान अवस्थेत सूर्यशनींच्या आंतरीय रचनेचें नि गुणांचे ज्ञान नसल्यामुळे व्रतविधींनी आणि प्रणामांनी ते प्रसन्न होऊन तसे न वागणारांपेक्षा वागणारांस ममतेने वागवितील असे वाटणें साहजिक होते. पण आता युगानुयुगांच्या मनुष्यांच्या उलटसुलट अनुभवांनी ते ज्योतिर्गोल निर्जीव नि ठराविक सृष्टीनियमांनी बद्ध असल्याचें समजून चुकले आहे. त्या अनुभवाने हीं व्रतविधानें कशीं साफ खोटीं पडतात ते पाहा!

सूर्यास संतोषविणारी गायत्री मुखाने सारखी जपत जरी कोणी ब्राह्मण वा सूर्यपूजक पारशी भर मध्यान्ही उष्ण कटिबंधात अनवाणी नि बोडका चालू लागला तरी त्यास उन्हाचे चटके, नास्तिकास लागतात त्याहून रेंसभरही कमी लागत नाहीत! उलटपक्षी जन्मात गायत्रीचें

अक्षरही न उच्चारणारा ब्राह्मण वा म्लेंच्छ सूर्यास सारखा शिव्या देत जरी चालला; पण पायात एक हातभर चामड्याचा जोडा नि डोईवर दीड रूपडीची छत्री घेऊन चालला - तर त्यास ते मध्यान्हीच्या उन्हाचे चटके त्या वैज्ञानिक प्रमाणात कमी लागल्यावाचून राहत नाहीत! म्हणजे सूर्यास प्रसादविण्याचें धार्मिक साधन जे तप ते नसून वैज्ञानिक साधन जे जोडा ते होय! जपापेक्षा जोड्यानेच शनिसूर्याची पीडा पुष्कळ कमी होते!

अहो, ह्या भारतवर्षात ज्या आम्हां हिंदूंनी सकाळ-संध्याकाळ-मध्यान्ही सूर्यासाठी भक्तिभावाने अर्घ्यांची संततधार युगानुयुगें सारखी वाहत ठेवली आहे आणि सूर्यस्तुतीच्या गायत्रीचा विश्वामित्रास तो महामंत्र प्रथम स्फुरला त्या प्राचीनतम क्षणापासून आजपर्यंत सारखा अखंड घोष चालू ठेवला आहे त्याच आम्हां हिंदूंच्या साम्राज्यावर आज शतकोशतके त्या सूऱ्याने पाठ फिरविली आहे. आमच्या आशेच्या-साम्राज्यावर तो मुळीच उगवत नाही! पण कधीच मावळत नाही कोणाच्या साम्राज्यावर? ज्यांनी त्याला युगायुगातून एकदाही अर्घ्य दिलेले नाहीत; गायत्रीचे जे घातक, सूर्यनमस्कारांवाचूनही ज्यांचे स्नायू पोलादी, मनगटें वज्रमुष्टी, भर सूर्यग्रहणात जेवणारे, सूर्यवंशाचे उच्छेदक, राहूचे नि केतूचे वेदबाह्य साथीदार त्यांच्याच साम्राज्यावर आज तो सूर्य मावळत नाही! प्राचीन सूर्योपासक बाबिलोन, मिश्र, मिसर सोडा; ते आज झालेले आहेत नामशेषच! पण आजही जीं दोनच राष्ट्रें सूयोपासक आहेत ती पारस नि भारत; त्यांच्याच राष्ट्रांवर आज राज्य आहे निराशेच्या एकछत्री काळ्याकभिन्न रात्रीचें! व्रतविधीने सूर्य प्रसादत नाही- व्रतविधित्यागाने सूर्य रागावत नाही, याचें याहून उत्कृष्ट प्रत्यक्ष प्रमाण दुसरें काय असणार! सूर्य सूर्याच्या  सृष्टीनियमाने प्रवर्ततो, निवर्ततो; आमच्या व्रतवैकल्याने नव्हे! तीच गोष्ट त्या शनीची, त्या संक्रातीची, त्या ग्रहणांची, त्या मंगळाची, त्या साऱ्या भाकडकथांची. रस्त्याच्या प्रत्येक दगडाला शनिप्रत्यर्थ शेंदूर फासून तेल चोळलें युगानुयुगें! पण त्या शनीची साडेसाती नेहमी भोवणार भारतासच! संक्रांत बसणार नेहमी आमच्याच बोकांडी; मंगळ आम्हांलाच काय तो अमंगळ; त्यांना जे दमडीचाही कधी धूप जाळीत नाहीत त्यांची उलट चंगळ!

२.१०.५ व्रताने नव्हे विज्ञानाने!

तेव्हा व्रतविधींची निवड करताना पहिला विवेक जो करावयाचा तो हा की ज्योतिर्गोल ह्या निर्जीव वस्तू. त्या सूर्य, शनी, मंगळ, ग्रहण, संक्रांतप्रभृती ज्योतिर्गोलविषयक वस्तूंना वा घटनांना संतोषविण्यासाठी म्हणून कोणतेही व्रतवैकल्य वा धर्मविधि करणें त्याज्य नि अधर्म्य मानले पाहिजे. कारण ती असत्याची पूजा होते. समाजात त्यायोगे त्या सृष्टपदार्थांच्या स्वरूपांविषयी, शक्तीच्या परिणामांविषयी खरें ज्ञान प्रसारण्याच्या हितकर कार्यी ह्या भाबडट समजुती तशाच चालू ठेवल्याने अडथळा येतो. त्यांच्या गतिस्थितीचे मनुष्यावर जे प्रतिकूल परिणाम होतात ते गुरुत्वाकर्षण, भूकंपप्रभृती घटनांच्या नि सृष्टीनियमांच्या प्रतिकूल परिणामाप्रमाणेच टाळण्यास विज्ञानाच्या प्रत्यक्षनिष्ठ नि प्रयोगसिद्ध उपायांनीच झटले पाहिजे या पोथीनिष्ठ नि लटक्या व्रतवैकल्यविधींनी नव्हे!

२.१०.६ सारांश

(१) धार्मिक श्रद्धेच्या दृष्टीने देखील ईश्वर हा सत्यस्वरूप आहे. सत्य म्हणजे जे आहे ते तसेच मानणें. सृष्टीचें वा सृष्टीकर्त्याचें ज्ञान नि उपासना म्हणजे त्या सत्याचीच उपासना असली पाहिजे. 'न हि सत्यात्परो धर्मः नानृतात्पातकं परम्' हे लक्षण नुसते सत्य बोलण्याच्या एका व्यावहारिक-आचाराचें नसून ते वर दिलेल्या अत्यंत व्यापक अशा तात्त्विक अर्थीच सर्व सुसंस्कृत धर्मात संमतिलेले आहे. तेव्हा ज्या ज्या व्रतात आणि उपासनेत सृष्टीच्या यथातथ्य स्वरूपाची विकृति गृहीत धरलेली असते ती सर्व व्रते असत्यचीच उपासना होत असल्यामुळे अधर्म्य ठरतात. मनुष्यात सत्यचा प्रसार करण्याचें धर्मकृत्य त्या व्रतामुळे अडखळते आणि असत्याचा प्रसार करीत राहण्याचें पाप मात्र पदरी पडते. हजारो वर्षांपूर्वी अनेक वस्तूंच्या सत्यस्वरूपाचें ज्ञान मनुष्यास नव्हते. त्या वेळेस त्यांना जे स्वरूप त्या काळच्या अपक्व ज्ञानामुळे सत्य वाटले त्याची उपासना करणारी व्रते, कथा, आख्यानें त्यांनी प्रचलविलीं यात त्यांचा तितकासा दोष नाही. परंतु त्यावर त्रिकालाबाधित धार्मिक सत्याचा छाप मारण्याच्या चुकीमुळे ते हजारो वर्षांपूर्वीचें मानवी अज्ञान चिरस्थायी करण्याचें मात्र पाप आता आम्ही करू नये. प्रत्याक्षनिष्ठ नि प्रयोगक्षम विज्ञानाच्या प्रगतीने ज्या ज्या पूर्वीच्या सृष्ट पदार्थाविषयीच्या कल्पना आज साफ खोट्या पडल्या आहेत, त्या आपण जरी पूर्वी त्यांस धर्म समजले गेले असले तरीही असत्य म्हणून आज टाकून दिल्या पाहिजेत, आणि त्या असत्याच्या पायावर उभारलेलीं तद्विषयक जीं जीं व्रते वा उपासना असतील त्या साफ सोडून दिल्या पाहिजेत.

(२) आज केवळ असत्याचीच पूजा ठरणाऱ्या अशा शेकडो व्रतांचें एक चटकन् लक्षात येण्यासारखें उदाहरण म्हणजे ज्योतिर्गोलविषयक व्रतांचा गट होय. चंद्रसूर्यशनिशुक्रमंगळप्रभृती ज्योतिर्गोल ह्या स्वतंत्र नि सजीव अशा देवता असून मनुष्याच्या स्तुतिनिंदेने त्या प्रसादू वा प्रक्षोभू शकतात, अशी मनुष्याची पूर्वी जगभर समजूत होती. आपल्या हिंदूंतच नव्हे, तर प्राचीन काळच्या बहुतेक राष्ट्रातून नि धर्मांतून ही समजूत आणि तीवर आधारलेल्या त्यांच्या उपासना, व्रतवैकल्यें प्रचलित असत. पण आता ज्योतिषशास्त्राच्या प्रगतीमुळे हे प्रयोगसिद्ध झालेले आहे की, हे सारे ज्योतिर्गोल निर्जीव पदार्थ असून त्यांच्या गतिस्थिती ह्या गणिताच्या कठोर नियमांनी बद्ध असून त्यांच्या प्रकाशघर्षणादिकांचे मनुष्यांवर होणारें परिणाम हे मनुष्यांच्या स्तुतिनिंदेने अथवा ब्राह्मणभोजनाने वा महारांस दान दिल्याने वा दगडास तेलशेंदूर फासल्याने वा शनिवारमंगळवारी उपाशी रहिल्याने वा अर्घ्यप्रदानाने वा शनिमाहात्म्याच्या वा सूर्यमाहात्म्याच्या पारायणाने लेशमात्र बदलू शकत नाहीत. त्यांचे परिणाम टाळण्याचा मार्ग शनिमाहात्म्यातील भाकडकथांप्रमाणे वागणें हा नसून, गणितरसायनवैद्यक या प्रयोगक्षम विज्ञानांच्या नियमांस समजून घेणें आणि त्यांच्या आधारे ते वैज्ञानिक प्रत्यक्ष फलदायी उपाय योजणें हा होय. मनुष्यास हे ज्ञान आता झाले असताही पूर्वीच्या अज्ञानाला 'धर्म' म्हणून उराशी बाळगणें आणि त्याची ती ती उपासना, व्रतवैकल्यें करीत राहणें ही असत्याचीच पूजा होणारी असल्यामुळे निर्भेळ अधर्म होय.

अगदी ताजे उदाहरण आगगाडीचें घ्या. हिंदुस्थानात प्रथम आगगाडी आली, तेव्हा शेकडो गावकऱ्यांना ती एक देवीच वाटली. ना घोडा, ना बैल, ना गाढव जुंपलेले; पण एखाद्या

वाघिणीसारखी धावते आहे भरमसाट! एक अद्‌भुत प्राणीच कोण्या आगम्य जंगलातून सुटला नि गावात शिरला जसा! आणि त्याची वीण वाढून जिकडेतिकडे आगगाडीच आगगाडी झाली! एखाद्या आता नसलेल्या भुयाराचें तोंड फटकन्‌दगड उचलताच उघडावें नि आतून सापाचें पेव फुटून भराभर सापच साप जिकडेतिकडे धावू लागावे तसे तें आश्चर्य! कित्येक वर्षे अनेक गावकरी लोहपथाच्या तारापाशी तिष्ठत नि आगगाडी येताच त्या देवीस प्रसादविण्यास्तव नवसाचे नारळ खटाखट फोडीत! त्यातल्या त्यात इतके बरें झाले, की केवळ अडाणी लोकांतच ही भावना राहिली आणि उपाध्यायवर्गाने ती अंगीकारली नाही. पण जर का कोण्या पंडितास त्या देवतेवर काही संस्कृत उनष्टुपें रचण्याची क्लृप्ति सुचली असती तर आगगाडीविषयीच्या त्या अडाणीपणावर ‘धर्मा’चें पुट चढून आपल्या नवसास पावणाऱ्या देवतांत एका आगगाडीची नि एका आगगाडीवाराची वा व्रताची चिरंतन भर पडली असती! पण धार्मिक वर्गास दुसऱ्याच एका कारणाकरिता अशी बुद्धी झाली नाही नि ते अडाणीपण त्यावर धार्मिक छाप पडून चिरंतन होण्याचें संकट टळले. ते कारण असे की, ती आगगाडी तिच्या डब्यात महारांसुद्धा साऱ्यांना सरमिसळ बसवी - सोवळें नेसून बसण्याची त्या बयाने कोणतीही स्वतंत्र सोय केली नव्हती. यामुळे ती धार्मिक पूजेस पात्र ठरली नाही, पण तरीही धार्मिक पूजेस पात्र ठरली नाही, पण तरीही धार्मिक निंदेस पात्र ठरलीच! पुष्कळ वर्षांपर्यंत आगगाडी असताही उपाध्याय नि भाविक वर्ग बैलगाडीतूनच तीर्थयात्रादिकांस जात नि आगगाडीतून वा आगनावेतून प्रवासल्यानंतर कपड्यांसुद्धा स्नान केल्यावाचून घरात प्रवेशत नसत! पण आगगाडीची वा आगनावेची सारी कळ हजारो लोकांस प्रत्यक्षपणे कळताच आता आगगाडीस नुसता शिष्टाचाराचा कोणी नमस्कारदेखील करीत नाही - मग नवसाचा नारळ फोडणें दूरच! आगगाडी, आगबोट, मोटारी यांच्यातही अपघात होतातच, प्राणहानीही होते; पण ती त्या वस्तू रागावल्या म्हणून होते असे आता गृहीत धरून अडाणी खेडवळदेखील त्यात बसताना त्यांच्याखाली कोंबडे मारून वा त्यांना कुंकू लावून त्यास प्रसादवीत बसत नाही. तर ते अपघात टाळण्यासाठी रस्ते नीट करणें, त्यांची अटक (ब्रेक) ठीक आहे की नाही ते पाहणें, त्यांचें ऐंजिन-गति-पेट्रोल यथावत्‌प्रमाणात ठेवणें या प्रत्यक्षसिद्ध उपायांसच तेवढा अवलंबतो.

आगगाडी, आगनाव, मोटारीप्रमाणे निर्जीव नि भावनाशून्य असणाऱ्या ह्या ज्योतिर्गोलांनासुद्धा आता यंत्रे म्हणूनच लेखिले पाहिजे. यापुढे प्रत्येक पंचांगात, निदान टिळक पंचांगात तरी मकरसंक्रमणाचा वैज्ञानिक अर्थ द्यावा; ग्रहणाचीं वैज्ञानिक कारणें द्यावी; ग्रहाचें व्यास नि गती, सूर्यमालेची नि पृथ्वीची अवश्य ती आकृति वैज्ञानिक परिभाषेत निवेदावी आणि ते संक्रांतीचें सोंग नि ती ग्रहणादिकांची भाकड वर्णनें साफ काढून टाकावीं. लोकांना धडधडीत थापा मारून असत्यात नि अज्ञानात पंचांगप्रवर्तक मंडळासारख्या या सुज्ञ संस्थांना ठेववते तरी कसे! अशा विवेकाची कसोटी लावली असता विज्ञानाने जी गोष्ट धडधडीत असत्य म्हणून ठरविली आहे आणि प्रत्यक्ष प्रयोगाने जी तशी असत्य असल्याचें प्रत्ययास येऊ शकते तिची उपासना, पूजा, वा प्रचार करण्यास कारण होणारी ही चंद्र-सूर्य-ग्रहोपग्रहादी ज्योतिर्गोल नि ग्रहणांसुद्धा ज्योतिर्घटना यासंबंधीची पन्नाससाठ व्रतवैकल्यें निव्वळ असत्याची पूजा, निव्वळ अधर्म ठरतात. पूर्वी अज्ञानाच्या अंधेरात दोरी साप म्हणून भासली त्यामुळे भीती वाटली ती साहजिक समजता येईल. पण आता ती साप नसून दोरीच आहे हे विज्ञानाच्या उजेडात स्पष्ट झाले असतानासुद्धा तो साप आहे म्हणून लोकांस थापा मारीत सुटणें, भिवविणें

नि काठ्या घेऊन तीवर मारीत बसण्याचा वा तिला दूध पाजण्याचा देखावा करणें हा मात्र काही अंशी निव्वळ वेडगळपणा नि काही अंशी लुच्चेगिरीही होणारी आहे.

(३) विज्ञानाने आज जीं सत्यें निर्विवादपणें प्रत्यक्ष प्रत्ययाच्या आधारें सिद्धिलीं आहेत त्यांच्या प्रचारास अडथळा करणारीं अज्ञानमय व्रते जशीं साफ सोडून दिलीं पाहिजेत तशींच या व्रतवैकल्यांचीं रूपें कोणचेंही ऐहिक फल न देता निव्वळ पुराणातील भाकडकथांच्याच आधारावर प्रचलविलीं जातात, त्या व्रतवैकल्याचीं ती रूपेंही बदललीं पाहिजेत. अशा प्रत्येक व्रतास जी कसोटी लावावयाची ती ही की, ह्या व्रताने ह्या लोकी स्वतःचा, स्वतःच्या राष्ट्राचा वा एकंदर मनुष्यजातीचा काहीतरी प्रत्यक्ष लाभ होतो आहे की नाही? तसा ऐहिक प्रत्यक्ष लाभ होत असेल तरच त्या व्रतवैकल्यात दवडला जाणारा काल नि धन काहीतरी सत्कार्यी लागले असे समजावें. नाहीतर ती व्रतवैकल्ये अशा रुपाने करू नयेत. व्रतांचा पारलौकिक लाभ पदरी पडायचा असेल तर तो पडूनसुद्धा त्यावाचून ऐहिक असा कोणचा तरी प्रत्यक्ष लाभही मनुष्यजातीच्या पदरात पडला पाहिजे. ह्या कसोटीस उतरतील तीच व्रतवैकल्यें तशा दुहेरी लाभास देणाऱ्या रुपात नि पद्धतीने आचरावीं म्हणजे जरी क्वचित्‌त्यांच्यापासून होणारा कल्पित वा संभवनीय पारलौकिक लाभ लटका पडला, तरीही त्यात दवडलेल्या समयाचा नि द्रव्याचा ऐहिक लाभ तरी निःशंकपणे पदरात पडणारा असल्याने ती केव्हाही अगदीच व्यर्थ जाण्याची आपत्ती येणार नाही. ह्या दुसऱ्या प्रकारच्या व्रतास ही कसोटी कशी लावावीं हे विशदिण्यासाठी आता या लेखांकात उदाहरणासाठी तशा काही व्रतांची छाननी करावयाचें योजले आहे.

### २.१०.७ लक्षवातीचे वा लक्ष दुर्वाचें व्रत

देवाची सेवा म्हणून केलीं जाणारीं हीं व्रतें, मकरसंक्रमणासारख्या एका घटनेला नाक आहे नि ती घटना गाढवावर बसलेली आहे अशा निर्भेळ असत्यास फैलावणाऱ्या थापेबाजीची नसून सोज्वळ असतात; यास्तव ती तितकी आक्षेपार्ह नसतात. पण त्यात विवेक इतकाच करावयाचा की देवास प्रसन्नविण्यासाठी केलेल्या या खटपटींचा प्रत्यक्ष व्यवहारातही काही उपयोग आज होत आहे का? पूर्वी मोठमोठ्या देवळांचे गाभारे अंधकारमय असत. घरातही समया, लामणदिवे, पणत्या यांचाच प्रचार असे. त्या कामी केलेल्या वाती एक आवश्यकताच असे. देवळात त्या उपयोगी पडत; घरातही लागत. पण हजारो वर्षांपूर्वीचें हातवातीच्याच उजेडात चाचपडण्याचें युग आता बदलले आहे. जुन्या प्रख्यात देवालयांच्या गाभाऱ्यातही आता विजेच्या वा ग्यासच्या झगझगीत बत्त्यांनी व बटनांनी सजावट होत आहे. घरीदारी तर खेड्यांतूनही कंदीलचिमण्या नि नगरातून विजेचे वा ग्यासचे दिवे खोल्याखोल्यातून लखलखाटत आहेत. मग आता ज्या खोलीत, सभामंडपात वा गाभाऱ्यात ग्यासच्या वा विजेच्या प्रकाशाचा झगझगाट झालेला आहे, तिथेच एक लामणदिवा वा पणती केवळ पणजोबांच्या वेळेस ती लावीत म्हणून लावून ठेवणें हास्यास्पद नाही काय? मोटारीला बैल लावणें किंवा मशीनगनचा गोळा धनुष्याच्या तांतीने फेकणें हे जितके विसंगत, वेडेपणाचें, तितकेच विजेच्या झुंबरांनी दिवसासारख्या लख्ख प्रकाशलेल्या गाभाऱ्यात समईचा वा लामणदिव्याचा मिणमिण नंदादीप उगीच धुरकटत ठेवणें हेही! तेव्हा ज्या देवळी वा ज्या घरी हातवातीच्या मिणिमिणि दिव्यांचा

मुळीच उपयोग होत नाही, त्या ठिकाणी लाख वातीचें हे व्रत म्हणजे वेळेचा, कापसाचा नि तेलाचा निव्वळ अपव्यय आहे. पणजीचें युग पणतीचेच असे. तेव्हा ती काडवाती करी ते शोभे. पण आता या लख्ख विजेच्या युगात लाखवातीच्या व्रतास देवही हसत असेल! तेव्हा ते व्रत आता त्या जुन्या मोडीच्या लामणदिव्यांच्या अडगळीतच टाकून देणें बरें.

पण तरीही त्या व्रतातील जो देवाच्या सेवेचा श्रद्धावंत मनाला उदार करणारा हेतू, तो मात्र सुटता कामा नये. त्याच हेतूने पण ज्यायोगे प्रत्यक्ष व्यवहारात आज मनुष्यजातीचें अल्पस्वल्प हितही साधता येईल अशा रूपाने ते व्रत आचरावें. एक कोणचा तरी तसा प्रकार सुचवावयाचा तर असे सुचविता येईल की, त्या वेळेत टकळीवर सूत काढावयास शिकून ते फक्कड सूत अमुक प्रमाणात देवाच्या नावे दान द्यावें एखाद्या प्रामाणिक निर्धन विणकऱ्यास! किंवा मागावर ते स्वतः विणावें नि ती खादी हीनदीन पण स्वतः शक्य ती मेहनत करणाऱ्या सच्छील कुटुंबास द्यावी. अशा लोकहिताने, नरांच्या सेवेने - जर लाखवाती नि तेल निष्कारण भुरुभुरू जाळण्याने तो संतोषत असेल तर - नारायण अधिकच संतोषेल यात शंका नाही!

२.१०.८ तीच गोष्ट लाख दुर्वांची!

तासन्तास परड्यातून नि खिंडारातून त्या गवताची एकेक काडी खुडीत वेळ गमवावयाचा आणि तो भारा गणपतीच्या डोक्यावर द्यायचा! पत्र्या नि दुर्वा वाहताना त्या भाऱ्याखाली बहुधा त्या गणपतिगौरींच्या टीचभर मूर्ती कापसाच्या ढिगात सरकी दबून गुदमरून जावी तशा नुसत्या गुदमरून जातात! एखाद्या अशा व्रतस्थ महिलेच्या भक्ताने जर स्वतःच्या महिलेला लाख कडब्यांच्या पेंढ्या वाहण्याचा प्रेमसंकल्प केला नि तिला मध्ये बसवून त्या पेंढ्या तिच्या औतीभौती, वरखाली, तिच्या कानात, नाकात, डोळ्यात, तोंडात त्या काड्या घुसतात की नाही तेदेखील न पाहता म्हण 'अर्पयामि' की रच पेंढी आशा वाहिल्या तर त्या भक्ताची तशी भक्ती जीव गुदमरून गेलेली ती स्त्री किती वेळ सोशील? मग सगुण भक्तीच्या दृष्टीने बोलायचें तर त्या गौरगणपतीच्या मूर्तीस आपल्या गवतपाल्यांच्या भाऱ्यात गुदमरुन टाकताना त्यांची काय काय दुर्दशा होत असेल हे नको का बघायला? श्वास घेण्यापुरती त्या मूर्तीच्या नाकापुढची जागा तरी रिकामी ठेवावी! पुन्हा हा लाख दुर्वाच्या गवताचा कां वाहायचा? गणपती गवत का खातो? गवताच्या भाऱ्यास वाहावयाचेंच, तर तो गायीस तरी वाहावा; तो भारा खाऊन झाल्यास पशू प्रसन्न होईल. या जगात पिता येईल असे दूध देईल. पण मोदक खाणाऱ्या गणपतीस लाखो दुर्वांच्या गवताचें भारे वाहावयाचें आणि गवत खाणाऱ्या नि ओखटवाणीच हौशीने खाणाऱ्या 'गोमातेस' माणसासारखे सुग्रास पंचपक्वान्नांचें पान वाढून तो गोग्रास वाहायचा! हीं का व्रते की विटंबना? भाकड पोथ्यांच्या नादाने असला पात्रापात्रतेचा लवलेश विचार न करणारा हा वेडगळपणा अक्षरशः आज खरोखरीच आचरला जात आहे की नाही बरें? पोथीच हवी तर ती भगवद्गीता नाही का? श्रद्धादेखील तिला उपनिषदासमान पूज्य मानते; तीत 'देशे काले च पात्रे' जे जे दान ते तेच सात्त्विक नि 'अदेशकाले यद्दापात्रेभ्यश्च दीयते! दीयते बहुलायासं तत् तामसमुदाहृतम्' असे सांगितले आहे. त्या प्रकारें व्रतात्मक दानात नि दानात्मक व्रतात आम्ही आता 'देशा' प्रमाणे नि 'काला'प्रमाणे पात्रापात्रविवेक केलाच पाहिजे.

तेव्हा हिरव्या गवतासंबंधी वा वनस्पतिविषयक व्रत करायचें तर शेतकरणीसारखा चक्क पातळाचा काचा मारून विळा घेऊन हिरव्यागार रानात जावें नि लाख दुर्वा खुडीत खिंडारात जो तास घालवावयाचा त्यापेक्षा त्याच वेळात कचाकच गवताच्या पंधरावीस हिरव्यागार पेंढ्या कापून देवाप्रीत्यर्थ गाईस घालाव्या किंवा सुवासिक सुंदर फुलांरानफुलांच्या परड्या भरभरुन आणून त्यांचे गजरे मोलकरी मुलींना भेट द्यावे, किंवा आपल्या वा कोण्या आप्ताच्या अंगणात स्वतः पाणी भरून फुलवाडी लावावी आणि मालती, सोनचाफा, जाईजुई, गुलाबांची सुंदर फुले प्रत्यही देवास वाहावीं; सारीच्या सारी उगीच देवावर ढीग रचून नव्हे, तर देवघरात शोभतील तितकी तिथे नि बाकी हार करून फुलपात्रातून घरात दाराशी नि घरात कुशलपणे विरचावीं. आपल्या घरच्या नि ज्यांना ती मिळत नाहीत अशा दीन कुमारिकांच्या केसांतून आपण स्वतः पाणी भरून वाढविलेल्या लतावेलींची ती ताजी टवटवीत फुले गुंफावी, की ज्यायोगे जिथेजिथे त्या वावरतील तिथेतिथे त्या त्या दिवशी नि रात्री सुरेखपणाचें नि सुवासाचें वातावरण दरवळत राहावें! अशा आरोग्यप्रद नि आनंददायी सौंदर्याची पूजा हेही एक व्रतच आहे. वाल्मीकीसारख्या वानप्रस्थाने देखील सीतेसारख्या संयमशील ललनेस सुद्धा असेच एक व्रत सांगून लडिवाळ आश्वासन दिले नाही का, की ‘पयोघटैराश्रमबलावृक्षान्संवर्धयन्ति स्वबलानुरूपैः! असंशयं प्राक्तनयोपपत्तेः स्तनंधयप्रीतिमवाप्स्यसि त्वम्!’

२.१०.९ वडपिंपळांना लाख प्रदक्षिणा

अशा वर्गातल्या व्रतासही वरचीच कसोटी लावावी. वनस्पतीशी जीवैक्याची भावना अनुभवावयाची वा संवर्धावयाची तर त्यांच्या भोवतीभोवती फिरण्याचा मार्ग टाकाऊ आहे. हे विशाल विस्ताराचे वृक्ष आपल्या उष्ण प्रदेशातील लोकांस त्यांच्या छायाशीलतेने अत्यंत वत्सल वाटावे नि त्याविषयी कृतज्ञता व्यक्तविण्याची प्रवृत्ती व्हावी हे आपल्या लोकांच्या दयाशील संस्कृतीस साजेसेंच आहे. पण त्यासाठी त्या झाडांचा देवच करून टाकणें आपल्या संस्कृतीच्या पदरी बुद्धिहीनतेचा दोष बांधण्यासारखें आहे! या विशाल नि उपयुक्त वृक्षांची मनुष्याला उपयुक्त होईल अशी लागवड वाढवणें, जोपासना करणें, इतर उपयुक्त वनस्पतीना त्यांच्या त्यांच्या प्रकृतीप्रमाणे खतपाणी देणें हीच ते मतैक्य प्रदर्शविण्याची उचित रीत, हींच झाडें चांगलीं का? तर मनुष्याला उपयुक्त म्हणून. मग भरवस्तीची शोभा बिघडविणारा वडपिंपळ किंवा ज्यांच्या फांद्या नि विस्तार पडावयास झालीं आहेत असा भरवाटेवरचा वडपिंपळ तोडून टाकणें हेच जेव्हा मनुष्याच्या हितास अवश्य, तेव्हा तेही केले पाहिजे. वडपिंपळ तोडायचाच नाही, ह्या हट्टापायी तो एकदम वाऱ्यासारशी कोसळून त्याखाली माणसें मरतात अशा घटना या देशात ज्या घडतात त्या आपली सुसंस्कृत दयाशीलता दाखवीत नसून रानटी क्रूरपणा मात्र दाखवितात.

वडपिंपळासारख्या झाडाखाली तापलेल्या वाटसरूस जशी छाया मिळते तशाच त्यांच्या प्रचंड फांद्या कोसळून प्रसंगी त्यांचा प्राणही जातो. ती निर्बुद्ध झाडें काही जाणूनबुजून आपले रक्षण करीत नाहीत; त्यांना प्रदक्षिणा घातली काय नि लाथा मारल्या काय, फांद्या पक्क्या आहेत तों छाया देणें, पोखरल्या की उन्मळून पडत खाली प्रदक्षिणा घालणारी बालबालिका जे सापडेल त्याचा चुराडा करणें, ह्या त्यांच्या भावनाशून्य यांत्रिक क्रिया! एक वेळ गाढवाच्या अंगावर हात फिरविला वा त्याला चुचकारले तर ते संतोषून अंगास खेटून लागते; काम अधिक

हौसेने करते; त्याची खोडी केली तर लाथा झाडते, पण त्या गाढवाइतकीदेखील मनुष्याच्या प्रेमलोभाची वा हिताहिताची सुसंवादी जाणीव ज्या वडपिंपळास नाही, त्यांना लाख प्रदक्षिणा घालण्यात काय अर्थ आहे! झाडांना जाणीव आहे पण तशी सूक्ष्मार्थी दगडांनाही आहे; निवडुंगालाही आहे; पण म्हणून तो निवडुंग उसासारखा सोलनू का खायचा?

ह्या पात्रापात्रतेच्या विचाराप्रमाणे उपयुक्ततेच्या दृष्टीनेही अशीं व्रते अधिकच टाकाऊ ठरतात. जुनी भाबडी दृष्टी त्या वडपिंपळांना देवता समजून फेऱ्या घालते तेही एक वेळ परवडेल; पण अशा जुन्या वेडेपणास नव्या वैज्ञानिक वा व्यावहारिक दृष्टीनेही समर्थिणारें जे एक पढतमूर्खांचे पथक असते, त्यांचें ते समर्थन तर त्या भाबडेपणास अधिकच धिक्कारार्ह करून सोडते. कसे ते पाहा - वडपिंपळाला लक्ष प्रदक्षिणा स्त्रियांनी घालाव्या या आमच्या दूरदर्शी दयाळू ऋषींनी सांगितलेल्या व्रताचें हे पढतमूर्ख असे समर्थन करतात की, घरात बसूनबसून बायकांस क्षयादिक विकार जडू नयेत, म्हणून ह्या व्रताच्या मिषें हा व्यायाम घालून दिला आहे ही त्याची उपयुक्तता! ह्याविषयी इतकेच म्हणावयाचें की क्षयादी विकार जडेतो बायकांस घराच्या खुराड्यात कोंडून ठेवणाऱ्या क्रूरतेस साजेल अशीच ही त्यांना अंगणातल्या वडाभोवती पाळीव कोंबड्यांसारखी गरगर फिरू देणारी दया आहे! बहुधा गावातल्या गाडीतळाच्या गदळ जागी वा अंगणात वा गल्लीकुचीच्या टोकाशी असलेल्या कोंदट वातावरणातच हे वडपिंपळही असतात. त्यांच्याभोवती सारख्या गरगर शेकडो फेऱ्या घालण्याच्या व्यायामाने क्षयरोग हटण्यापेक्षा होण्याचाच अधिक संभव; क्षयरोगी स्त्री लाख गिरक्या घेताघेता चक्कर येऊन तिथल्या तिथे मुक्त झाली नाही म्हणजे भाग्य! क्षयरोगापासून बचावणारा व्यायामच स्त्रियांस द्यावयाचा होता तर त्या दूरदृष्टि सर्वज्ञ ऋषींची दूरदर्शी नव्हती की काय? प्रत्यही संध्याकाळी स्त्रियांनी त्या गावाबाहेरच्या मोकळ्या वातावरणात सलीलपणे हिंडून यावें असे व्रत असते तर ते 'व्यायामा'र्थ म्हणता येतं. खरी गोष्ट अशी आहे की, पूर्वी साऱ्या जगभर झाडाझुडुपांना देवता मानून पुजण्याची जी चाल प्रचलित असे, त्याच चालीचें आपल्या हिंदुधर्मात उरलेलें हे एक अज्ञान आहे. त्याचा व्यावहारिक लाभ दमडीचाही नाही.

एकदा असा अभिप्राय आम्ही व्यक्तवीत असता एक जुन्याचे प्रामाणिक अभिमानी म्हणाले, 'त्यापासून काहीतरी व्यावहारिक लोकोपयोगी लाभही होईल असे वळण या वडपिंपळाच्या लक्षप्रदक्षिणांच्या व्रतास लावा - ते अगदीच धिक्कारता काय!' तेव्हा आम्ही म्हटले, 'त्या व्रतापासून ऐहिक लाभही करून घेण्याची दुसरी तोड तर काही सुचत नाही. हां, एक तोड आहे. त्या वडापाशी एक चिमुकला तेलाचा घाणा बसवावा; त्याची साखळी त्या व्रतस्थ महिलेल्या कंबरपट्टयास अडकवावी; घाण्यात तीळ टाकून मग तिने प्रदक्षिणा घालण्यास आरंभावें म्हणजे ज्या हजारबाराशे तिच्या प्रदक्षिणा प्रत्यही व्हावयाच्या त्या संपताच शेरदीड शेर तेल तरी त्या घाण्यात गळेल, ते देवाच्या नावे कोणा मेहनती पण दरिद्री कुटुंबास दान द्यावें; म्हणजे एका महिन्याचा फोडणीचा खर्च तरी निघेल! तसे करवत नसेल तर ही अशीं पारलौकिक दृष्ट्या अगदी भाकड नि व्यावहारिक दृष्ट्या अगदी कुचकामी व्रते करण्यात समय नि श्रम दवडू नयेत.'

महिलांनो, फेऱ्या घालण्याचेंच व्रत करावयाचें, तर स्वदेशी वस्तूंच्या प्रचारार्थ प्रत्यही पन्नास घरांतील कुटुंबांत जाऊन प्रचार करण्याचें व्रत घ्या. तुम्ही पांचपांचजणी, देवाचें कार्य

म्हणून मानअपमान न पाहता जर पन्नास घरी प्रत्यही आळीपाळीने भेट द्याल नि त्या कुटुंबात स्वदेशी साखर, बांगड्या, स्टोव्ह, काचकाम, धारकाम(कटलरी), कापडप्रभृती वस्तू वापरण्यासाठी स्त्रियांचीं मनें वळविण्यास झटाल; ज्यांनी तसे निश्चयिले त्यांचा तो निश्चय टिकून आहे की नाही याची सतत वर्षभर पाहणी करीत राहाल; वेळी स्वतः ते ते विकाऊ स्वदेशी सामान नेऊन दुकानात असते त्याहून स्वस्त द्याल तर आम्ही अशा चळवळीच्या अनुभवाची हमी देतो की, तुमचें गाव स्वदेशीचें तसे कट्टर गिऱ्हाईक होईल की जसें शंभर व्याख्यानांनी वा वृत्तपत्रीय अग्रलेखांनी होऊ शकत नाही! व्याख्यानालेखांनी महिन्या दीड महिन्याची हुल्लड हाते. पण स्वदेशीची साथ नि संतत ज्योत तेवत ठेवली जाते अशा संतत नि घरोघरी केलेल्या प्रचारामुळे, पाहणीमुळे. बरें ह्या स्वदेशीच्या जाणिवेची ज्योत घरोघर अशी तेवत ठेवल्याने जी मानसिक राष्ट्रीय शिकवण लोकांस मिळेल; जी आर्थिक उन्नति होऊन स्वदेशी कामकऱ्यांच्या तोंडात दोन घास पडतील; परदेशात जाणारा इतका पै पैसा स्वदेशात राहील, त्या स्वदेशसेवेने, त्या नरनारींच्या सेवेने तो नारायण वडपिंपळाभोवती लाख वेळा बैलासारखे गरगर फिरल्याने वा लाखवातीचा कापूस उगीच जाळून टाकल्याने वा लाख दुर्वांचा नि बेलांचा भारा वाहिल्याने तो नारायण संतोषत नाही असे कधीतरी घडेल काय? आणि त्या वडपिंपळाच्या प्रदक्षिणांनी मिळणारें जे काय तुमचें काम्य फल असेल, तेही तो देव या व्रतानेही दिल्यावाचून राहील काय? मिशनरी बाया जशा ख्रिस्ती धर्माचा उपदेश करीत तुमच्या वस्तीत फिरतात, तशा तुम्ही शुद्धीचा उपदेश करीत बाट्या ख्रिश्चन वस्तीत हिंडा; ते व्रत धरा! अमुकच प्रकारची लोकसेवा करा, हा आग्रह नाही. तुम्हांस व्यक्तिशः जी झेपेल ती लोकसेवा करा; पण या लोकी लोकोपकारक कोणते तरी प्रत्यक्ष फल देणारें पुण्यकृत्य ज्यांत साधते अशींच व्रते धरा म्हणजे राष्ट्रसेवा घडेल नि पारलौकिक दृष्ट्या ती लोकसेवा केव्हाही पुण्यप्रदच असल्याने व्रताने जो कोणचा सकाम वा निष्काम पारलौकिक लाभ तुम्हांस हवा तोही जर वडपिंपळाच्या सेवेने मिळत असेल तर त्या लोकसेवेच्या प्रत्यक्ष परोपकारी व्रतानेही मिळेलच मिळेल. कारण काही झाले तरी नारायणाची व्यक्ती वडपिंपळ, दगडधोंडा, शेणमाती यांच्या जड मूर्तींहून नराच्या सचेतन मूर्तीतच अधिक उत्कटत्वाने आलेली आहे, हे नाकारण्याची छाती भाकडातील भाकड पोथीसही होणारी नाही! नराच्या सेवेइतकी कोणतीही पूजा, कोणतेही व्रत नारायणास संतोषवीत नाही. 'सारंसारं समुदधृत्य' जे शास्त्रेंही सांगतात ते हेच, की 'परोपकारः पुण्याय पापाय परपीडनम्!' विरक्त भक्तीच्या भर रंगातही तुकोबा जाणून आहेत की,

जे का रंजले गांजले त्यांसी म्हणे जो आपुले!

तोचि साधु ओळखावा, देव तेथेचि जाणावा!

व्रताची पोथी म्हटली की ती प्रथम वाचावी!

अथश्रीपासून नव्हे तर इतिश्रीपासून!

ज्योतिर्गोलविषयक व्रतांना सृष्टीनियमांच्या अज्ञानामुळे ती प्रचलित झालेलीं म्हणून अज्ञानजन्य म्हणता येतील; वर दिग्दर्शिलेल्या लाख दुर्वा व्रतादिक वर्गास भाबडें म्हणता येईल; पण त्यापेक्षा निराळा जो शेकडो व्रतांचा आणखी एक वर्ग आहे त्यास तर भोंदू हेच नाव लावणें भाग पडते. त्यांचा मुख्य उद्देश दक्षिणा नि दानें उपटण्याचे शक्य तितके प्रसंग शोधून काढण्यावाचून दुसरा काहीही असेलसें त्या त्या पोथ्यांवरून दिसत नाही. त्या त्यांच्या

भाकड उपपत्त्या, ती पोकळ फळें, ती बाष्कळ विधिविधानें - आणि शेवटी ती ठराविक 'दक्षिणाः पान्तु' - ते सर्व वाचताच धडधडीत थोतांड वाटल्यावाचून राहात नाही. उदाहरणार्थ एकदोन भाकडकथा पाहा.

**कोकिळा व्रत** - सुसंस्कृत अनुष्टुपात लांबलचक रचलेल्या ह्या पोथीचा सारांश असा, की एकदा दक्षयज्ञविध्वंसनार्थ शंकरपार्वतीचें भांडण झाले; शंकराच्या शापाने पार्वती कोकिळा झाली; उ:शाप होऊन पुन्हा पार्वतीची पार्वती होऊन नांदू लागली. यासाठी सर्व स्त्रियांनी युगानुयुगें कोकिळेचें व्रत करावें म्हणजे ठराविक दिवशी कोकिळा पुजावी. पण ती कशी? तर उत्तम पक्ष म्हणजे यथाशक्ती एक सोन्याची कोकिळा करावी; डोळे मोत्यांचे, पाय रुप्याचे आणि रुप्याच्या वृक्षावर तिला बसवावी, स्नान, उपास करून तिची पूजाअर्चा झाल्यांवर शेवटी ती सोन्यामोत्याची कोकिळा त्या रुप्याच्या वृक्षासुद्धा दान द्यावी भटास! आजही स्त्रिया हे व्रत असे आचरतात.

आता ही भक्ति की भामटेगिरी? शंकर-पार्वती लाखो वर्षांपूर्वी म्हणे भांडले! पण त्यानंतर ते भांडण मिटून ते पुन्हा चांगले नांदू लागले, हसले, नाचले. सोंगट्या खेळले, त्यांना मुलेलेकरें झालीं. ह्या साऱ्या बातम्या भूलोकांवर कधीच येऊन पोचल्या आहेत आणि ज्याअर्थी ह्या बिनतारेच्या युगातही त्या शंकरपार्वतीचें वेडेवाकडें झाल्याची बातमी आलेली नाही, त्या अर्थी ते अजूनही संसार थाटूनच आहेत हे उघड आहे. मग आता कोणा एक्या नवराबायकोच्या क्षणिक भांडणात पार्वती कोकिळा झाली म्हणून कर कोकिळा की पूज हा खाक्या युगानुयुगे हवा कशाला? पार्वती कोकिळाच राहिली असती तर तीच कोकिळा तेवढी भेटताच तिला कोणीही नमस्कार केला असता; पण ती पुन्हा पार्वती झाली म्हणता. पार्वती एक कोकिळा झाली म्हणून साऱ्या कोकिळा पार्वत्या होतात की काय? देव एकदा डुक्कर (वराह) झाले म्हणून आजही धर डुक्कर की कर पूजा असे करायचें की काय? बरें, एवढ्यावरही कोकिळाच पुजायची, तर उत्तम मार्ग म्हणजे कोकिळेच्या एका खऱ्या जिवंत पिलास धरून हिरव्यागार वृक्षावर स्थापून त्याची पूजा करावी; ते पाळावें हवें तर! पण मग भटास काय लाभ राहिला त्या उठाठेवीत! म्हणून पार्वती जिवंत कोकिळा झाली असता पुजायची कोकिळा हवी निर्जीव सोन्याचीच! नि पार्वतीच्या कोकिळेचे डोळे चांगले सजीव पाणीदार असता पुजायच्या कोकिळेचे डोळे हवेत पांढरे झालेले मोत्यांचे! बरें, सोन्यामोत्यारुप्यांची का कोकिळा होईना; पूजल्यावर ती यजमानानेच भक्तिभावाने स्वत:च्या देव्हाऱ्यात ठेवावी हे साहजिकच! पण नाही! ती लगेच देऊन टाकली पाहिजे भटाला! तरच ते व्रत सफळ; नाहीतर इत्थंभूत निष्फळ! अर्थात् त्या व्रताचें सारें मर्म पोथीच्या शेवटच्या पानात त्या दक्षिणाः पान्तूतच सापडणारें आहे!

**संकटी सोमवार** - सोमवारी सबंध दिवस शक्य तर पाणीही न पिता उपास करावा. संध्याकाळी रोटाचे तूपगूळ घालून तीन लाडू करावेत; एक गाईला, एक देवाब्राह्मणास नि एक आपण खावा. असे कडक उपास सोळा सोमवारी करावे! नि शेवटी शक्यतो सोळा जोडपीं भटांची बोलावून त्यांस रोटतूपगुळांचे लाडू यथेच्छ जेवावे; गायीस पान वाढून द्यावें नि मग ते उपासव्रत सोडून आपण जेवावें! त्या बिचाऱ्या स्त्रीने सोळा सोमवार कडकडीत उपास करावे; त्याचें प्रत्यक्ष फळ मात्र मिळावें सोळा भटांच्या जोडप्यांस चमचमीत जेवण्याचें, आणि गायीस! माणसाने उपाशी राहावें नि गायीस- पशूस लाडू चारावे! अशा बाष्कळपणाने पोथी म्हणते तसा

देव प्रसादत असो वा नसो; पण प्रत्यक्ष नि:शंकपणे जर कोणी प्रसादत असेल तर तीं सोळा भटांची जोडपींच होत! 'दक्षिणाः पांतु' वाचून ह्या व्रताचें भारुड रचण्याचा दुसरा काय उद्देश असणार!

यास्तव या व्रतांच्या पोथ्यांविषयी एक सर्वसाधारण नियमच असा सांगावासा वाटतो की, व्रतांची पोथी घेतली की ती अथश्रीपासून प्रथम वाचूच नये. कारण, तेवांची मोठमोठीं नांवें, अद्भुत कहाण्या, स्वर्गाच्या पुष्पितवाक्गप्पा यांच्या ढिगांत पोथी रचणारांचा कावा अगदी छपून बसलेला असतो. पण तो श्वटच्या पानात मात्र न हुडकता सहज सापडतो. तेव्हा पोथी घेताच तिचें शेवटून पारायण करू लागावें; इतिश्री प्रथम वाचावीः जर का त्या शेवटच्या पानात दक्षिणाः पांतूवरच मुख्य भर दिसला, तर भंभरी नव्वद असें हें व्रत कोण्या भक्ताने रचलें नसून भोंदूनेच रचले असलें पाहिजे असे बेखटक समजावें नि ते टाकून द्यावें.

आणि स्वीकारावें कोणकोणचें व्रत? तर ज्या व्रतामुळे आज विज्ञानाने साफ खोट्या पाडलेल्या कोणत्याही भोतिक वा भावनिक असत्याचा प्रसार करण्याचें पाप घडत नाही, ज्या व्रतात देवाप्रीत्यर्थ करावयाच्या दानाने वा स्वत:स भोगाव्या लागणाऱ्या उपास, प्रदक्षिणा देहदंडप्रभृती कष्टांच्या योगाने प्रत्यक्ष व्यवहारात आपल्या हिंदूधर्माच्या नि राष्ट्राच्या सद्य:स्थितीत काहीतरी अैहिक हितही साधता येईल, मनुष्याची आज इथे रोखठोक अशी काही हितावह सेवा केल्याचा परोपकार घडेल तें तेंच व्रत आचरावें. म्हणजे त्यायोगें ऐहिक फळ तरी प्रत्यक्षपणे इथल्या इथे हाती पडेल.

२.१०.१० व्रतें करावींत तर अशीं!

उदारहणार्थ, महिलावर्गापुरतेंच बोलावयाचें तर येत्या चातुर्मास्यात महिलांनो, तुम्ही यथाशक्ती, यथापरिस्थिती ह्या आपल्या अत्यंत अडचणीत सापडलेल्या प्राणप्रिय हिंदू राष्ट्राच्या सेवेप्रीत्यर्थ खाली दिग्दर्शिलेल्या किंवा त्या हेतूने त्यासारख्या व्रतांपैकी एकेक जण एकेक व्रत जर धराल तर केवढी राष्ट्रसेवा करू शकाल बरे? 'आपल्या परसात स्वतः आपल्या मेहनतीने कोथिंबीर, वांगी, मिरच्याप्रभृती शाकभाज्या लावीन नि देवा, तुझ्या नावे पुण्याच्या अनाथ विद्यार्थिगृहासारख्या एका प्रामाणिक संस्थेस चार महिने प्रत्यही ताजी भाजी पुरवीन.' असें व्रत लाख वाती, फूलबेल वाहण्याच्या व्रताहून कितीतरी देवप्रिय नि राष्ट्रहीतकर होईल बरें ? किंवा असे व्रत घ्या की, 'या चातुर्मास्यात आपल्या हाताने विणलेले वा शिवलेले पंचवीस सदऱ्यापोलक्यांचे जोड जीं हीनदीन पूर्वास्पृश्यांची मुलेंमुली शाळेत जातात त्यांतील योग्य मुलांत वाटीन.' 'चतुर्थीचे एकवीस मोदक वा सोमवारचीं सोळा जोडपीं सावकारी वा विम्याची अडत वा व्यापर करणाऱ्या पोटभरू ठराविक भटांसाठी राखून ठेवण्यापेक्षा तितकें सामान वा पैसे दक्षिणा म्हणून आज हिंदूसंघटनांचे कार्य खऱ्या रामदासी बाण्याने करणाऱ्या मसूरकर महाराजांच्या आश्रमास दान करीन.' येत्या चातुर्मास्यात एक स्वदेशी साखरेचाच प्रश्न हाती घेतला तरी जर प्रत्येक जिल्हाच्या नगरात दहावीस स्त्रियांनी प्रत्यही 'मी दहा कुटुंबांस भेट देऊन स्वदेशी साखरेचा प्रचार करीन' असें व्रत घेतलें नि चालविलें तर त्या चार महिन्यांत त्या गावी चार हजार रूपये तरी परदेशी साखरेत जायचे वाचतील! करून पाहा होतं कीं नाहीं असे तें. आमची हमी अनुभवाची आहे. किंवा उभ्या वर्षात 'शंभर रूपयांची स्वदेशी बांगडी

घरोघर फिरून खपवीन' किंवा 'तुळशीच्या लग्नासीठी ताशेवाजंत्री लावण्याचा मूर्खपणा सोडून तशा व्रतांचा खर्च राखून अनाथ पण सत्पात्र अशा दोन शुद्धीकृत हिंदूंच्या योगक्षेमाचा व्यय मी सोशीन वा त्या कार्यार्थ प्रत्यक्ष कार्यकत्या अशा हिंदूसभेस नि आर्यसमाजास दान देईन!' रत्नागिरी हिंदूसभेसारख्या ज्या संस्था शुद्धिकार्य सारखें करताहेत त्यांना मुल्लामिशनच्या हातून सोडविलेल्या अर्भक वा अनाथ मुलांमुलींचे संगोपन करताना नाकी नऊ येतात. जर शंभर रूपये मिळताच शंभर विधर्मीयांस हिंदू करून दाखविणारी उमरावतीची हिंदूसभा द्रव्यसाहाय्यास्तव अडकून पडत आहे, तशा प्रत्यक्ष कार्यी तसा एक रूपया दान दिलात तर एक वंश हिंदुराष्ट्राच्या गोटात आणल्याचे श्रेय संपादाल! हिंदू धर्माचा क्षय थांबविणारा निदान रक्ताचा एक बिंदू त्यात भर टाकून वा गळताना वाचवून जे पुण्य लाभेल तें पांचशे अर्घ्य सूर्याला देऊन लाभणार नाही! पाणी ओतायचें तर तें व्रताचे पाणी तान्हलेल्याच्या तोंडात ओता ताम्हनात व नदीत नव्हे! तो मुंबईचा श्रद्धानंद अनाथ महिलाश्रम पाहा! त्याने मिशनमुल्लांच्या तावडीतून हजारो हिंदू स्त्रिया वाचविल्या; पण त्याला अजून अर्भकालाय काढावयास दमडीही गाठी नसल्यामुळे त्या स्त्रियांच्या अर्भकांचे काय करावें हें सुचत नाही. सोन्याच्या कोकिळा इ. सावकारीचा धंदा करणाऱ्या भटांना देण्यापेक्षा कोण्या श्रीमान् महिलेने जर त्या श्रद्धानंद महिलाश्रमास स्त्रियांसाठी बारा लुगडी चातुर्मास्यानिमित्त दान दिलीं व स्वतःच्या कुटुंबातील मृत व्यक्तींच्या स्मरणार्थ एक हजार वा एक लाख जें यथाशक्ति तें दान, अर्भकालय बांधून देण्यासाठी दिलें तर तें अंत्येष्टीप्रीत्यर्थ गाय, भांडी, वस्त्रे, दानें, गावच्या धंदेवाईक भटास देण्यापेक्षा त्या दीन दयाळू देवास शतपटीने अधिक प्रिय होणार नाही काय? किंवा विमानविद्या शिकणाऱ्या एका सुयोग्य पण निर्धन विद्यार्थ्याचा खर्च सोसण्याचे व्रत घ्या!

महिलांनो, जर हे हिंदुराष्ट्र जगेल, तगेल, जिंकील तर हिंदुधर्मही जगेल! जर हे हिंदुराष्ट्रच मेलें, हिंदुस्थानचें अहिंदुस्थान झालें, तर ही हिंदूसंस्कृती, हा हिंदुधर्मही मेलाच पाहिजे! अशा स्थितीत तुम्हां हिंदूमहिलांस खरे धार्मिक व्रत आचरावयाचें असेल तर आजच्या परिस्थितीत ह्या हिंदुराष्ट्राची प्रत्यक्ष फल देणारी अशी काहीतरी सेवा प्रत्यही करा! तुमच्या द्रव्याचें दान, तुमच्या श्रमाचें दान, तुमच्या अन्नाचें दान, प्रसंगी तुमच्या मनाचें नि अवश्य तर तुमच्या प्राणांचेही दान ह्या प्राणप्रिय हिंदुराष्ट्रालाच द्या! तोच आजचा ऐहीक धर्म; तोच आजचा पारलौकिक धर्म! व्रतविधीत जो विवेक आज करावयाचा तोही हाच!

***